।।श्रीहरिः।।

# अनुक्रमणिका





।। श्रीपरमात्मने नमः ।।

# भगवंतांच्या स्वभावाचे रहस्य

आपल्याला हे जे मनुष्य-शरीर प्राप्त झाले आहे ते भगवंतांच्या कृपेनेच प्राप्त झाले आहे; आपल्या कर्तृत्वामुळे नव्हे, भगवंतांनी किती दयाळुपणाने हा नियम केला आहे की, चौऱ्यांशी लक्ष योनी जन्म भोगल्यानंतर तर जीवात्म्याला आत्मोद्धारासाठी मानव शरीर देतातच, मग कोणी किती का मोठा पापी असेना. हा अविनाशी जीवात्मा चौऱ्यांशी लक्ष योनीतून फिरता फिरता त्रासून जातो, त्यावेळी दयाळू भगवंत ह्याच्यावर कृपा करून त्याला मानवी शरीर देतातच.

**आकर चारि लच्छ चौरासी । जोनि भ्रमत यह जिव अबिनासी ।।**
**फिरत सदा माया कर प्रेरा । काल कर्म सुभाव गुन घेरा ।।**
**कबहुँक करि करुना नर देही । देत ईस बिनु हेतु सनेही ।।**

(रा० च० मा०, उत्तर० ४४ । २-३)

विचार करायला हवा, की भगवंतांचा हा अहेतुक दयाळू आणि प्रेममय सहृदयतेने परिपूर्ण किती उत्तम प्रतीचा स्वभाव आहे ते ह्या सहृदयतेने भरलेल्या स्वभावाचे यथार्थ ज्ञान प्राप्त केल्याने मनुष्य परमात्म्याच्या प्राप्ती रूपातील परम शान्तीला प्राप्त होतो. भगवंतांनी गीतेत म्हटले आहे -

**सुहृदं सर्वभूतानां ज्ञात्वा मां शान्तिमृच्छति ।**

(५ । २९ चा उत्तरार्ध)

'माझा भक्त मला सर्व प्राणिमात्रांचा सुहृद् म्हणजेच निःस्वार्थी दयाळू आणि प्रेममय - अशा तत्त्वाने जाणून शान्तीला प्राप्त होतो.'

भावार्थ असा आहे की भगवंत तर सदैव सर्व प्रकारे पूर्णकाम आहेत तरी सुद्धा अत्यंत दयाळू स्वभाव असल्यामुळे कोणताही हेतू न ठेवता स्वाभाविकपणेच सर्वांवर कृपा करून सर्वांचे हितच करीत असतात आणि वेळोवेळी अवतार घेऊन निरनिराळ्या प्रकारे अशा लीला करतात

की, ज्या ऐकूनच लोक भगवंतांचे भक्त होऊन तरून जातात. भागवतात सांगितले आहे -

**अनुग्रहाय भूतानां मानुषं देहमास्थितः ।**
**भजते तादृशीः क्रीडा याः श्रुत्वा तत्परो भवेत् ।।**

(१० । ३३ । ३७)

'प्राणिमात्रांवर कृपा करण्यासाठीच भगवंत आपल्या स्वतःला मनुष्यरूपात प्रकट करतात आणि अशा प्रकारच्या लीला करतात की ज्या ऐकून जीवात्मा भगवंतांच्या भक्तीत परायण होतो.'

त्यांच्या प्रत्येक कृतीत जगाचे हित साठलेले आहे. जीवात्म्यांसाठी ते जे कोणतेही विधान करतात ते दया आणि प्रेम यांनी परिपूर्ण असते. जो मनुष्य हे रहस्य जाणून अशी खात्री करून घेतो की भगवंत माझ्यावर अकारण प्रेम करतात, ते जे काही करतात ते माझ्या हितासाठीच करतात. प्रत्येक अवस्थेत जे काही होते त्याला परम दयाळू भगवंतांचे प्रेम आणि दयेने ओतप्रोत असलेले मंगलमय विधान समजून तो सदैव प्रसन्न आणि समाधानी असतो, ह्यामुळे त्याला परमानंद आणि परमशान्ती प्राप्त होते.

सर्व शक्तिमान, सर्वलोकमहेश्वर, सर्वांचे नियंत्रण करणारे, सर्वान्तर्यामी, अनंत गुणगणांचे सागर, अत्यंत दयाळू, अत्यंत प्रेमळ असे ते भगवंत आपल्या स्वतःला प्राणिमात्रांचे सुहृद म्हणून दर्शवितात. एखादा मानव जेव्हा त्यांच्या ह्या म्हणण्यावर विश्वास ठेवून त्यांना आपला सुहृद म्हणून मानतो त्यावेळी त्याला केवढा अलौकिक आनंद आणि अपूर्व शान्तता लाभते, त्याचा अंदाज येणे देखील कठीण आहे.

वास्तविक भगवंतांप्रमाणे भगवंतच आहेत. त्यांच्यासारखा तर या जगात, हेतुरहित दयाळू, प्रेमळ, निष्काम भावनेने परमहित करणारा कोणीही नाही.

**उमा राम सम हित जग माहीं । गुरु पितु मातु बंधु प्रभु नाहीं ।।**

(रा० च० मा०, किष्किंधा० १२ । १)

माता-पिता, बन्धू-बांधव सगळे आपल्या स्वार्थासाठीच प्रेम करतात. स्वार्थाशिवाय कोणीही नाही. बृहदारण्यक-उपनिषदात श्रीयाज्ञवल्क्य मुनींनी मैत्रेयीला म्हटले आहे की, पती, स्त्री, पुत्र, धन इत्यादी सगळे आपल्या हेतूसाठीच प्रिय होतात.

**न वा अरे सर्वस्य कामाय सर्वं प्रियं भवत्यात्मनस्तु कामाय सर्वं प्रियं भवति ।**

(बृ० उ० २ । ४ । ५)

'हे मैत्रेयी, दुसऱ्याच्या हेतूपूर्तीसाठी सगळे प्रिय नसतात. तर मनुष्याला आपल्या स्वार्थासाठी सगळे प्रिय असतात.'

श्रीतुलसीदासजी सुद्धा म्हणतात -

**सुर नर मुनि सब कै यह रीती । स्वारथ लागि करहिं सब प्रीती ।।**

(रा० च० मा०, किष्किंधा० १२ । १)

**स्वारथ मीत सकल जग माहीं । सपनेहुँ प्रभु परमारथ नाहीं ।।**

(रा० च० मा०, उत्तर० ४७ । ३)

परंतु भगवंत कोणत्याही हेतूशिवायच सर्व प्राणिमात्रांवर प्रेम करतात. किती उच्च प्रतीचा, नि:स्वार्थी, प्रेमाने परिपूर्ण सुहृद असा त्यांचा स्वभाव आहे की ज्याला काही सीमाच नाही. भलेही कोणी किती मोठा पापी का असेना, अनन्य भक्तीने भगवंतांना शरण जाताच भगवंत त्याला शुद्ध करून त्याचा उद्धार करतात.

रामचरितमानसात भगवान श्रीराम म्हणतात -

**कोटि बिप्र बध लागहिं जाहू । आएँ सरन तजउँ नहिं ताहू ।।**
**सनमुख होइ जीव मोहि जबहीं । जन्म कोटि अघ नासहिं तबहीं ।।**
**जौं सभीत आवा सरनाई । रखिहउँ ताहि प्रान की नाई ।।**

(रा० च० मा०, सुन्दर० ४४ । १, ४)

**पुनि पुनि सत्य कहउँ तोहि पाहीं । मोहि सेवक सम प्रिय कोउ नाहीं ।।**
**भगतिवंत अति नीचउ प्रानी । मोहि प्रानप्रिय असि मम बानी ।।**

(रा० च० मा०, उत्तर० ८६ । ४, ५)

कारण की,

**रहति न प्रभु चित चूक किए की । करत सुरति सय बार हिए की ।।**

(रा० च० मा०, बाल० २९ । ३)

भक्ताची चूक-भूल भगवंतांच्या स्मरणात राहात नाही आणि ते त्याच्या हृदयातील सद्भावनांचेच शेकडो वेळा स्मरण करीत असतात.

एवढेच नव्हे तर, जो खऱ्या अन्तःकरणाने 'मी आपला आहे' किंवा शब्दांनी सुद्धा एकदा जरी म्हणाला तरी भगवंत त्याला कायमचे निर्भय करतात. भगवंतांनी स्वतःच असे घोषित केले आहे -

**सकृदेव प्रपन्नाय तवास्मीति च याचते ।**
**अभयं सर्वभूतेभ्यो ददाम्येतद् व्रतं मम ।।**

(वा० रा०, युद्ध० १८ । ३३)

'जो माणूस 'मी आपला आहे' ह्या भक्तिभावाने प्रभावित होऊन केवळ एकदाच स्वतःला सर्व प्रकारे मला अर्पण करतो. उत्तम प्रकारे मला अर्पण होतो, त्या खऱ्या भक्तीने प्रार्थना करणाऱ्या त्या भक्ताचा स्वीकार करून मी त्याला सर्व प्राणिमात्रांपासून भयरहित करतो - हे माझे व्रत आहे.'

भगवंतांचा स्वभाव किती श्रेष्ठ आहे, ते भक्ताच्या प्रेमाकडेच बघतात, जात-पात, धन, विद्या, बुद्धी, शक्ती इत्यादींकडे बघत नाहीत.

भक्त प्रल्हादने भगवंतांची स्तुती करताना म्हटले आहे -

**मन्ये धनाभिजनरूपतपःश्रुतौज-**
**स्तेजःप्रभावबलपौरुषबुद्धियोगाः ।**
**नाराधनाय हि भवन्ति परस्य पुंसो**
**भक्त्या तुतोष भगवान्गजयूथपाय ।।**

(श्रीमद्भ० ७ । ९ । ९)

'मला माहित आहे की, संपत्ती, कूळ, रूप, तपश्चर्या, विद्या, ओज, तेज, प्रभाव, बल, पौरुष, बुद्धी आणि योग यातील कोणतीही गोष्ट पुरुषोत्तम भगवंतांना संतुष्ट करण्यास समर्थ नाही, परंतु भक्तिमुळेच

तर भगवंत गजेंद्रावर प्रसन्न झाले होते.

कारण की, भगवंत तर केवळ भक्ताच्या अनन्य आणि विशुद्ध प्रेमाकडेच बघतात.

भगवंतांनी गीतेत म्हटले आहे,

**तेषां ज्ञानी नित्ययुक्त एकभक्तिर्विशिष्यते ।**
**प्रियो हि ज्ञानिनोऽत्यर्थमहं स च मम प्रियः ।।**

(७ । १७)

'त्यांच्यापैकी (त्या भक्तांपैकी) नेहमी माझ्या ठिकाणी अनन्य प्रेमभक्तीनेयुक्त (निष्कामी) असा ज्ञानी भक्त अत्यंत श्रेष्ठ आहे, कारण मला तत्त्वत: जाणणाऱ्या ज्ञानी भक्ताला मी अत्यंत प्रिय आहे व तो ज्ञानी मला अत्यंत प्रिय आहे.'

श्रीबृहस्पतींनी इन्द्राला म्हटले आहे -

**सुनु सुरेस उपदेसु हमारा । रामहि सेवकु परम पिआरा ।।**

(रा० च० मा० अयोध्या० २१९ । १)

भगवान श्रीराम स्वत: काकभुशुंडीला म्हणतात -

**सत्य कहउँ खग तोहि सुचि सेवक मम प्रानप्रिय ।।**
**अस बिचारि भजु मोहि परिहरि आस भरोस सब ।।**

(रा० च० मा०, उत्तर ८७ (ख))

म्हणून आपण इतर सर्वांविषयी आशा किंवा विश्वास सोडून निष्काम भावाने भगवंतांची अनन्य भक्ती केली पाहिजे.

भगवंतांच्या स्वभावातील तत्त्व-रहस्याला जाणणारा भरत हा परम भगवद्भक्त होता. भगवंतांच्या ठिकाणी अत्यंत उच्च कोटीची त्याची श्रद्धा होती. श्रीतुलसीदासांनी त्याच्या उत्तम भावाचे अत्यंत सुंदर चित्रण केले आहे; त्यात भगवंतांच्या स्वभावाचे दर्शन घडते.

**सील सकुच सुठि सरल सुभाऊ । कृपा सनेह सदन रघुराऊ ।।**
**अरिहुक अनभल कीन्ह न रामा । मैं सिसु सेवक जद्यपि बामा ।।**

(रा० च० मा०, अयोध्या० १८३ । ३)

राम जनमि जग कीन्ह उजागर । रूप सील सुख सब गुन सागर ।।
पुरजन परिजन गुर पितु माता । राम सुभाउ सबहि सुखदाता ।।
बैरिउ राम बड़ाई करहीं । बोलनि मिलनि बिनय मन हरहीं ।।
सारद कोटि कोटि सत सेषा । करि न सकहिं प्रभु गुन गन लेखा ।।

(रा० च० मा० अयोध्या० २०० । ३-४)

जब समुझत रघुनाथ सुभाऊ । तब पथ परत उताइल पाऊ ।।

(रा० च० मा०, अयोध्या० २३४ । ३)

मैं जानउँ निज नाथ सुभाऊ । अपराधिहु पर कोह न काऊ ।।
मो पर कृपा सनेहु बिसेषी । खेलत खुनित न कबहूँ देखी ।।
सिसुपन तें परिहरेउँ न संगू । कबहुँ न कीन्ह मोर मन भंगू ।।
मैं प्रभु कृपा रीति जियँ जोही । हारेहुँ खेल जितावहिं मोही ।।

(रा० च० मा०, अयोध्या० २६० । ३-४)

राउरि रीति सुबानि बड़ाई । जगत बिदित निगमागम गाई ।।
कूर कुटिल खल कुमति कलंकी । नीच निसील निरीस निसंकी ।।
तेउ सुनि सरन सामुहें आए । सकृत प्रनामु किहें अपनाए ।।
देखि दोष कबहुँ न उर आने । सुनि गुन साधु समाज बखाने ।।
को साहिब सेवकहि नेवाजी । आपु समाज साज सब साजी ।।
निज करतूति न समुझिअ सपनें । सेवक सकुच सोचु उर अपनें ।।
सो गोसाइँ नहिं दूसर कोपी । भुजा उठाइ कहउँ पन रोपी ।।

(रा० च० मा०, अयोध्या० २९९ । १-४)

भगवान श्रीरामांना वनातून अयोध्येस परत येण्यासाठी जेव्हा एक दिवसाचा अवधी होता तेव्हा भगवंतांच्या विरहाने भरत अत्यंत व्याकुळ होतो आणि भगवंतांच्या मधुर स्वभावाचे स्मरण करून म्हणतो -

जौं करनी समुझै प्रभु मोरी । नहिं निस्तार कलप सत कोरी ।।
जन अवगुन प्रभु मान न काऊ । दीन बंधु अति मृदुल सुभाऊ ।।

(रा० च० मा० उत्तर० प्रारंभाची चौपाई ३)

भरताच्या म्हणण्याचे तात्पर्य हे आहे की, भगवंत दीन दुःखी लोकांचे बंधू आहेत, त्यांचा स्वभाव अत्यंत कोमल आहे, त्यामुळे ते आपल्या भक्तांच्या दोषांकडे बघूच शकत नाही.

म्हणून आपण देखील आपला भाव भरताप्रमाणेच राखला पाहिजे. मग आपल्या कल्याणाच्या बाबतीत काही संदेहच राहणार नाही; कारण 'भगवंत सर्व प्राणिमात्रांचे सुहृद् आहेत', हे तत्त्वरहस्य जाणणारा माणूस देखील सर्व प्राणिमात्रांचा सुहृद होऊन भगवंतांचा श्रेष्ठ भक्त होतो. भगवंतांनी गीतेत देखील म्हटले आहे -

**अद्वेष्टा सर्वभूतानां मैत्रः करुण एव च ।**
**निर्ममो निरहंकारः समदुःखसुखः क्षमी ।।**
**संतुष्टः सततं योगी यतात्मा दृढनिश्चयः ।**
**मय्यर्पितमनोबुद्धिर्यो मद्भक्तः स मे प्रियः ।।**

(१२ । १३-१४)

'जो पुरुष सर्व प्राणिमात्रांच्या ठिकाणी द्वेषभावना रहित, सर्वांवर निःस्वार्थपणे प्रेम करणारा, आणि अकारण दयाळू असतो; तसेच ममता रहित, निरहंकारी, सुख दुःखाच्या प्रसंगी समवृत्ती असलेला आणि क्षमाशील असतो म्हणजेच अपराध करणाऱ्याला देखील अभयदान देतो; तसेच जो योगी नेहमीच संतुष्ट आहे, मन-इंद्रियांसह शरीरावर ज्याने संयम ठेवलेला आहे; आणि माझ्या ठिकाणी दृढ विश्वास असलेला असा आहे, ज्याने मला मन आणि बुद्धी अर्पण केली आहे असा माझा भक्त मला प्रिय आहे.'

भगवंतांच्या तत्त्व आणि रहस्याला जाणून घेतल्यावर मनुष्य भगवंतांचाच होऊन जातो. तसेच भगवंत देखील त्याला आपल्या यथार्थ तत्त्वाचे ज्ञान देतात. रामचरितमानसात श्रीवाल्मीकींचे वचन आहे -

**सोइ जानइ जेहि देहु जनाई । जानत तुम्हहि तुम्हइ होइ जाई ।।**

(रा० च० मा०, अयोध्या० १२७ । २)

भगवंतांना यथार्थ तत्त्वाने तोच पुरुष जाणू शकतो की, ज्याला भगवंत जाणतात. तसेच भगवंतच ज्याचे एकमात्र आहेत, ज्याने भगवंतांवर आपला भार टाकला आहे, ज्याने आपले मन, बुद्धी, इंद्रिये, प्राण, शरीर सर्व काही भगवंतांना समर्पण केले आहे; तोच भगवंतांना जाणून घेण्यास पात्र होतो आणि त्यालाच भगवंत आपल्या यथार्थ स्वरूपाचे ज्ञान देतात.

गीतेत देखील सांगितले आहे -

**मच्चित्ता मद्गतप्राणा बोधयन्तः परस्परम् ।**
**कथयन्तश्च मां नित्यं तुष्यन्ति च रमन्ति च ।।**
**तेषां सततयुक्तानां भजतां प्रीतिपूर्वकम् ।**
**ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयान्ति ते ।।**

(१० । ९-१०)

'निरंतर माझ्याच ठिकाणी एकाग्र चित्त होणारे आणि माझ्याच ठिकाणी प्राणांना अर्पण करणारे माझे भक्तजन, माझ्या भक्तीच्या आपापसातील चर्चेतून माझा प्रभाव जाणून घेत तसेच गुण आणि प्रभावासह माझे वर्णन करीत असताना नेहमी संतुष्ट होतात आणि वासुदेवस्वरूप अशा माझ्या ठिकाणी सदैव रममाण होतात. अखंडपणे माझ्या ध्यानी लागणारे आणि प्रेमपूर्वक मला भजणाऱ्या भक्तांना मी अशा प्रकारचा तत्त्वज्ञानरूप योग देतो की ज्यामुळे ते मलाच प्राप्त होतात.'

भगवंतांसारखा या जगात कुणीही प्रभावशाली किंवा गुणवान नाही. त्यांच्या तुलनेने हा जीव अगदीच क्षूद्र आहे. यापुढे सुद्धा भगवंतांना जो कोणी ज्या श्रद्धने, ज्या प्रकारांनी भजतो; भगवंत त्याला त्याच श्रद्धेने आणि त्याच प्रकाराने भजतात -

**ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम् ।**

(गीता ४ । ११ चा पूर्वार्ध)

मतितार्थ आहे की, वात्सल्य, दास्य, सख्य, माधुर्य इत्यादी

ज्या कोणत्याही भावनेने जो भगवंतांना भजतो; भगवंत त्याला त्याच भावनेतून भजतात. उदाहरणार्थ, रुक्मिणी इत्यादी पट्टराण्या पत्नीच्या भावनेतून स्वत:च्या ठिकाणी असलेल्या माधुर्य भावनेने युक्त अशी भक्ती करीत होत्या; त्यांच्या दृष्टीने भगवंत परमपती होऊन त्यांच्या भावनांची परिपूर्ती करीत असत. ज्या गोपिका भगवंतांना सख्यभावानेयुक्त परकीय माधुर्य भावाने भजत होत्या त्यांच्यासाठी भगवंत तशाच प्रकारच्या सख्यभावाने युक्त प्रेमास्पद होत असत. श्रीदामा इत्यादी गोपसुत सख्यभावाने भक्ती करीत असत. म्हणून त्यांच्याबाबतीत भगवंत मित्र भावाने राहात असत. अर्जुन इत्यादी भक्त सख्य आणि दास्य भावाने भक्ती करीत असत. म्हणून त्यांच्या बाबतीत भगवंत स्वामी आणि सखा होऊन वागत असत.

अशा तऱ्हेने जो ज्या प्रकारे भगवंतांची भक्ती करतो त्याच्या बाबतीत भगवंतही तसेच वागतात. उदाहरणार्थ शरशय्येवर शयन करणारे भीष्म भगवंतांचे ध्यान करतात. तसेच भगवंत देखील भीष्मांचे ध्यान करतात असे आढळते.

महाराज युधिष्ठिराला भगवंत स्वत:च सांगतात -

**शरतल्पगतो भीष्मः शाम्यन्निव हुताशनः ।**
**मां ध्याति पुरुषव्याघ्रस्ततो मे तद्गतं मनः ।।**

(महा० शान्ति० ४६ । ११)

'हे राजा ! शरशय्येवर असलेले पुरुषसिंह भीष्म की जे आता विझणाऱ्या अग्नीप्रमाणे होत आहेत, ते माझे ध्यान करीत आहेत. म्हणून माझे चित्त देखील त्यांच्याच ठिकाणी लागले आहे.

एवढेच नव्हे तर, भगवंताला जो प्रेमाने भजतो, त्याला भगवंत आपल्या हृदयात स्थान देतात आणि भगवंत त्याच्या हृदयात निवास करतात.

भगवंतांनी गीतेत म्हटले आहे -

**समोऽहं सर्वभूतेषु न मे द्वेष्योऽस्ति न प्रियः ।**

**ये भजन्ति तु मां भक्त्या मयि ते तेषु चाप्यहम् ।।**

(९ । २९)

'सर्व प्राणिमात्रांच्या ठिकाणी मी व्यापलेलो आहे; मला कुणीही अप्रिय नाही किंवा प्रियही नाही; परंतु जे भक्त प्रेमाने माझी भक्ती करतात ते माझ्या ठिकाणी आहेत आणि मी देखील त्यांच्या ठिकाणी प्रत्यक्ष प्रकट असतो.'

असाच भाव भागवतात देखील आढळतो -

**न तस्य कश्चिद् दयितः सुहृत्तमो**
**न चाप्रियो द्वेष्य उपेक्ष्य एव वा ।**
**तथापि भक्तान् भजते यथा तथा**
**सुरद्रुमो यद्वदुपाश्रितोऽर्थदः ।।**

(१० । ३८ । २२)

'भगवंतांना कोणी प्रिय नाही किंवा अप्रियही नाही. त्यांचा कुणी अत्यंत सुहृद नाही किंवा शत्रूही नाही. त्यांच्याकडून उपेक्षेलाही कुणी पात्र नाही. तरी सुद्धा आपल्याजवळ येऊन याचना करणाऱ्यांना कल्पवृक्ष ज्याप्रमाणे ते मागतील ती वस्तू देतो त्याचप्रमाणे भगवान् श्रीकृष्ण सुद्धा जो त्यांची जशा प्रकारे भक्ती करतो त्याला त्याच रूपाने भजतात. ते आपल्या प्रेमळ भक्तांवर अतिशय प्रेम करतात.'

श्रीतुलसीदासजी सुद्धा म्हणतात -

**आरत लोग राम सबु जाना । करुनाकर सुजान भगवाना ।।**
**जो जेहि भायँ रहा अभिलाषी । तेहि तेहि कै तसि तसि रुख राखी ।।**
**सानुज मिलि पल महुँ सब काहू । कीन्ह दूरि दुख दारुन दाहू ।।**

(रा० च० मा० अयोध्या० २४४ । १-२)

रामचरितमानसात भरताचे बोल आहेत -

**यह नइ रीति न राउरि होई । लोकहुँ बेद बिदित नहिं गोई ।।**
**जगु अनभल भल एकु गोसाईं । कहिअ होइ भल कासु भलाईं ।।**
**देउ देवतरु सरिस सुभाऊ । सनमुख बिमुख न काहुहि काऊ ।।**

**जाइ निकट पहिचानि तरु छाहँ समनि सब सोच ।।**
**मागत अभिपत पाव जग राउ रंक भल पोच ।।**

(रा० च० मा० अयोध्या० २६७ । ३-४, २६७)

विचार केला पाहिजे, भगवंतांचा किती उच्चप्रतीचा स्वभाव आहे. त्यांच्यासारखा अत्यंत दयाळू कोणीही नाही.

श्रीकाकभुशुंडी म्हणतात -

**प्रभु रघुपति तजि सेइअ काही । मोहि से सठ पर ममता जाही ।।**

(रा० च० मा० उत्तर १२३ । २)

**सिव अज पूज्य चरन रघुराई । मो पर कृपा परम मृदुलाई ।।**
**अस सुभाव कहुँ सुनउँ न देखउँ । केहि खगेस रघुपति सम लेखउँ ।।**

(रा० च० मा० उत्तर १२४ । २)

श्री उद्धवांनी म्हटले आहे -

**अहो बकी यं स्तनकालकूटं**
**जिघांसयापाययदप्यसाध्वी ।**
**लेभे गतिं धात्र्युचितां ततोऽन्यं**
**कं वा दयालुं शरणं व्रजेम ।।**

(श्रीमद्भा० ३ । २ । २३)

'पापिणी पूतनेने आपल्या स्तनांना हालाहल विष माखून भगवान श्रीकृष्णांना ठार मारण्याच्या हेतूने त्यांना दूध पाजले होते, तिला देखील भगवंतांनी अशा प्रकारची उत्तम गती दिली की जी दाईला मिळण्यास योग्य होती. त्या भगवान श्रीकृष्णांव्यतिरिक्त आणखी कोण दयाळू आहे की ज्याला शरण जावे?'

जो मनुष्य अत्यंत दयाळू अशा भगवंतांच्या स्वभावाचे रहस्य जाणतो त्याला भगवंतांशिवाय इतर दुसरे काहीच चांगले वाटत नाही. म्हणून भगवंतांना सोडून तो नाशवंत, क्षणभंगूर आणि दुःखरुपी धन, संपत्ती, पत्नी, पुत्र इत्यादींच्या कसा बरे भजनी लागू शकेल?

भगवान शंकर म्हणतात -

**उमा राम सुभाउ जेहिं जाना । ताहि भजनु तजि भाव न आना ।।**

(रा० च० मा० सुंदर० ३४ । २)

मग तो भगवंतांना कधीच विसरत नाही आणि भगवंत देखील त्याला कधीच विसरत नाहीत.

गीतेत दर्शविले आहे की-

**यो मां पश्यति सर्वत्र सर्वं च मयि पश्यति ।**
**तस्याहं न प्रणश्यामि स च मे न प्रणश्यति ।।**

(६ । ३०)

'जो पुरुष संपूर्ण प्राणिमात्रांच्या ठिकाणी सर्वांचे आत्मरूप अशा मज वासुदेवालाच व्यापकपणे पाहतो आणि संपूर्ण प्राणिमात्रांना मज वासुदेवाच्या ठिकाणी बघतो, त्याच्या बाबतीत मी अदृश्य होत नसतो आणि तो देखील माझ्यासाठी अदृश्य नसतो.'

सारांश असा की, भगवंतांचा स्वभाव अत्यंत कोमल, मृदू, सरळ, सरस, मधुर आणि मनोहर आहे. वास्तविक त्यांच्यासारखे तेच आहेत. त्यांच्यासारखा अकारण दयाळू, निःस्वार्थी, प्रेमळ, सुहृद, शरणागतवत्सल, दीनबन्धू आणि पतितपावन दुसरा कोणीही नाही.

म्हणून आपण भगवंतांच्या अत्यंत दयाळू आणि प्रेममय मधुर स्वभावाला जाणून घेऊन त्यांचे नित्य-निरंतर स्मरण-मनन करीत असताना त्यांच्या प्रेमात मुग्ध झाले पाहिजे. त्यामुळे सहजपणे आणि त्वरित भगवत्प्राप्ती होऊ शकते.

*****

# भगवदाश्रयामुळे इह-परलोकींचे कल्याण

लौकिक आणि पारलौकिक सर्व दुःखांचा नाश, संपूर्ण लौकिक आणि पारमार्थिक संपत्तींच्या प्राप्तीचे सर्वोत्तम साधन आहे. भगवंतांचा अनन्य आश्रय घेऊन शुद्ध मनाने त्यांचे भजन करणे. आणखी लौकिक आणि पारलौकिक सर्व सुखांचा नाश, हे संपूर्ण लौकिक-पारमार्थिक संपत्तींच्या नाशाचे साधन आहे. उपभोगांचा अनन्य आश्रय घेऊन भगवंतांना विसरून जाणे. आज आपण भगवंतांना विसरलेलो आहोत आणि आमचे जीवन केवळ उपभोगांचा आश्रय बनले आहे. त्यामुळेच दुःख, संताप आणि विनाशाचे एवढे पर्वत आपल्यावर एकसारखे कोसळत आहेत. जे लोक कृतिशील आणि विविध प्रकारची कामे करण्यास समर्थ आहेत, त्यांनी भगवंतांना प्रसन्न करण्यासाठी, भगवंतांचे स्मरण करीत, कालानुकूल, स्वधर्माला योग्य अशा कर्मांमधून भगवंतांची पूजा केली पाहिजे आणि जे कमी समर्थ आहेत किंवा असमर्थ आहेत त्यांनी आर्त आणि दीन भावाने भगवत्प्राप्तीद्वारा धर्माच्या अभ्युदयासाठी आणि विश्व-शांतीसाठी अनन्यभावाने हाक मारली पाहिजे.

आपली अनन्य भावाने मारलेली हाक कधीच वाया जाणार नाही. आपल्यामध्ये असला पाहिजे द्रौपदीसारखा विश्वास, असली पाहिजे गजेंद्रासारखी निष्ठा, आणि सर्वांत जास्त म्हणजे आपल्यात असली पाहिजे प्रल्हादांसारखी आस्तिकता आणि निष्कामभाव; की ज्याचे बोल खरे करण्यासाठी भगवंत नरसिंहरूपाने खांबातून प्रकट झाले - **'सत्यं विधातुं निजभृत्यभाषितम् ।'** (भागवत ७ । ८ । १८)

संकटे, कष्ट, असहाय्य स्थिति, अशुभ आणि अन्याय तोपर्यंतच आपल्या समोर आहेत, जोपर्यंत आपण भगवंतांना विश्वासाने हाक मारीत नाही. एका महोदयांनी एक घटना सांगितली होती. एका घरात

गुंडांनी पतीला पकडून ठेवले आणि दोन गुंडांनी त्याच्या पत्नीला विवस्त्र करून तिच्यावर बलात्कार करायला तयार झाले. दोघा पति-पत्नींचा निरुपाय झाला - ते असहाय्य होते. पत्नीने आर्त होऊन, रडत रडत भगवंतांना हाक मारली. तिला द्रौपदीची आठवण झाली. बास, त्याच वेळी ते दोन्ही गुंड आपापसात भांडू लागले. एकाने दुसऱ्याला सुरा खुपसला. तो खाली पडताच पति-पत्नीला सोडून उरलेले गुंड पळून गेले; दरम्यान पत्नीला खांद्यावर घेऊन स्वतःचा बचाव करीत पतीला पळून जाण्याची संधी मिळाली.

भारतातल्या सती साध्वी आज द्रौपदीप्रमाणे भगवंतांना साद घालतील तर भगवंत कुठेही गेलेले नाहीत. ते त्वरित कोणत्याही रूपाने प्रकट होऊन त्या सती साध्वींचे दुःखहरण करतील आणि त्याच क्षणापासून त्यांना दुःख देणाऱ्यांच्या विनाशाची त्यांना खात्री पटेल.

दुष्ट दुःशासनाच्या हातात सापडलेल्या असहाय्य द्रौपदीने आर्त होऊन मनातल्या मनात भगवान श्रीकृष्णांचे स्मरण करून म्हटले होते -

**गोविन्द द्वारकावासिन् कृष्ण गोपीजनप्रिय ।।**
**कौरवैः परिभूतां मां किं न जानासि केशव ।**
**हे नाथ हे रमानाथ व्रजनाथार्तिनाशन ।**
**कौरवार्णवमग्नां मामुद्धरस्व जनार्दन ।।**
**कृष्ण कृष्ण महायोगिन् विश्वात्मन् विश्वभावन ।**
**प्रपन्नां पाहि गोविन्द कुरुमध्येऽवसीदतीम् ।।**

(महा० सभा० ६८ । ४१ - ४३)

'हे गोविंद ! द्वारका निवासी सच्चिदानंद प्रेमघना ! गोपीका - वल्लभा ! सर्व शक्तिमान प्रभो ! कौरव माझा अपमान करत आहेत. आपल्याला हे ठाऊक नाही काय? हे नाथ ! हे लक्ष्मीनाथ ! हे व्रजपती ! हे आर्तिनाशन जनार्दन ! मी कौरवांच्या समुद्रात बुडून जात आहे. आपण माझा उद्धार करा. हे कृष्ण ! हे महायोगी ! हे विश्वात्मा, विश्वजीवनदायक गोविंद ! कौरवांनी घेरलेली अशी मी संकटात सापडले

आहे. आपल्याला मी शरण आले आहे ! आपण माझे रक्षण करा.'

द्रौपदीची आर्त हाक ऐकून भक्तवत्सल प्रभू त्याच क्षणी द्वारकेहून धावत आले आणि द्रौपदीला वस्त्र पुरवून तिची लाज राखली. परंतु दुष्ट दु:शासनाने द्रौपदीचे जे केस ओढले होते, ते मोकळेच राहिले ते दु:शासनाला शासन झाले त्या दिवसापर्यंत द्रौपदीचा केशपाश मोकळाच होता. ती पांडवांबरोबर वनात राहात होती. भगवान श्रीकृष्ण पांडवांना भेटायला गेले होते. तेथे एकांतात रडून द्रौपदीने भगवान श्रीकृष्णांना म्हटले, "मी पांडवांची पत्नी, धृष्टद्युम्नाची बहीण आणि तुझी सखी असूनही कौरवांच्या सभेत फरपटली गेले ! ही किती दु:खाची गोष्ट आहे ! भीमसेन आणि अर्जुन अत्यंत बलवान असूनही माझे रक्षण करू शकले नाहीत. त्यांच्या बळाचा आणि पौरुषाचा धिक्कार असो ! हे जिवंत असतांना दुर्योधन एक क्षणभर तरी कसा जिवंत आहे? श्रीकृष्णा! दुष्ट दु:शासनाने सुद्धा सती असलेल्या माझी वेणी धरून फरपटत आणले आणि हे पांडव टुकूटुकू बघत राहिले !" असे म्हणून द्रौपदी रडू लागली. तिचा श्वास दीर्घ होऊ लागला आणि सद्‌गदित होऊन मोठ्या आवेशाने तिने म्हटले, 'हे श्रीकृष्णा ! हे पती, पुत्र, पिता, भ्राता माझे कोणीही नाहीत; पण तू सुद्धा माझा कोणी नाहीस? श्रीकृष्णा तू माझा नातेवाईक आहेस आणि अग्निकुंडातून उत्पन्न झालेली मी पवित्र रमणी आहे; तुझ्यावर माझे पवित्र असे प्रेम आहे आणि तुझ्यावर माझा अधिकार देखील आहे. म्हणून माझे रक्षण करण्यास तू समर्थ देखील आहेस. म्हणून तुला माझे रक्षण करावेच लागेल." तेव्हा रडणाऱ्या द्रौपदीला आश्वासन देऊन श्रीकृष्णांनी म्हटले -

**रोदिष्यन्ति स्त्रियो ह्येवं येषां क्रुद्धासि भाविनि ।**
**बीभत्सुशरसंच्छन्नाञ् शोणितौघपरिप्लुतान् ।।**
**निहतान् वल्लभान् वीक्ष्य शयानान् वसुधातले ।**
**यत् समर्थं पाण्डवानां तत् करिष्यामि मा शुचः ।।**
**सत्यं ते प्रतिजानामि राज्ञां राज्ञी भविष्यसि ।**

गुंडांनी पतीला पकडून ठेवले आणि दोन गुंडांनी त्याच्या पत्नीला विवस्त्र करून तिच्यावर बलात्कार करायला तयार झाले. दोघा पति-पत्नींचा निरुपाय झाला - ते असहाय्य होते. पत्नीने आर्त होऊन, रडत रडत भगवंतांना हाक मारली. तिला द्रौपदीची आठवण झाली. बास, त्याच वेळी ते दोन्ही गुंड आपापसात भांडू लागले. एकाने दुसऱ्याला सुरा खुपसला. तो खाली पडताच पति-पत्नीला सोडून उरलेले गुंड पळून गेले; दरम्यान पत्नीला खांद्यावर घेऊन स्वत:चा बचाव करीत पतीला पळून जाण्याची संधी मिळाली.

भारतातल्या सती साध्वी आज द्रौपदीप्रमाणे भगवंतांना साद घालतील तर भगवंत कुठेही गेलेले नाहीत. ते त्वरित कोणत्याही रूपाने प्रकट होऊन त्या सती साध्वींचे दु:खहरण करतील आणि त्याच क्षणापासून त्यांना दु:ख देणाऱ्यांच्या विनाशाची त्यांना खात्री पटेल.

दुष्ट दु:शासनाच्या हातात सापडलेल्या असहाय्य द्रौपदीने आर्त होऊन मनातल्या मनात भगवान श्रीकृष्णांचे स्मरण करून म्हटले होते -

**गोविन्द द्वारकावासिन् कृष्ण गोपीजनप्रिय ।।**
**कौरवै: परिभूतां मां किं न जानासि केशव ।**
**हे नाथ हे रमानाथ व्रजनाथार्तिनाशन ।**
**कौरवार्णवमग्नां मामुद्धरस्व जनार्दन ।।**
**कृष्ण कृष्ण महायोगिन् विश्वात्मन् विश्वभावन ।**
**प्रपन्नां पाहि गोविन्द कुरुमध्येऽवसीदतीम् ।।**

(महा० सभा० ६८ । ४१ - ४३)

'हे गोविंद ! द्वारका निवासी सच्चिदानंद प्रेमघना ! गोपीका - वल्लभा ! सर्व शक्तिमान प्रभो ! कौरव माझा अपमान करत आहेत. आपल्याला हे ठाऊक नाही काय? हे नाथ ! हे लक्ष्मीनाथ ! हे व्रजपती ! हे आर्तिनाशन जनार्दन ! मी कौरवांच्या समुद्रात बुडून जात आहे. आपण माझा उद्धार करा. हे कृष्ण ! हे महायोगी ! हे विश्वात्मा, विश्वजीवनदायक गोविंद ! कौरवांनी घेरलेली अशी मी संकटात सापडले

**पतेद् द्यौर्हिमवाञ् शीर्येत् पृथिवी शकलीभवेत् ।।**
**शुष्येत्तोयनिधिः कृष्णो न मे मोघं वचो भवेत् ।**

(महा० वन० १२ । १२८ - १३१)

'हे कल्याणी ! तू ज्यांच्यावर संतापलेली आहेस, त्यांच्या स्त्रिया सुद्धा थोड्याच दिवसात, अर्जुनाच्या भयंकर बाणांनी तुकडे होऊन रक्तबंबाळ होऊन जमिनीवर पडलेल्या आपल्या नवऱ्यांना पाहून तुझ्यासारखेच रुदन करतील. पांडवांच्या हिताचे असेल असेच काम मी करीन. तू शोक करू नकोस. मी तुझ्यासमोर प्रतिज्ञा करतो की तू पट्टराणी होशील. मग भलेही आकाश फाटले, हिमालयाचे तुकडे तुकडे झाले, पृथ्वीचा चुराडा झाला आणि समुद्र कोरडा पडला तरी हे द्रौपदी ! मी सांगितलेली गोष्ट कधीच असत्य होऊ शकणार नाही.'

द्रौपदीच्या दु:खांचा नाश करणारे हे भगवंत आज सुद्धा कुठेही गेलेले नाहीत. द्रौपदीप्रमाणे विश्वासपूर्वक अंत:करणाने त्यांना साद घालणाऱ्यांची उणीव आहे. दु:ख सागराला जर सहजपणे पार करायचे असेल तर विश्वास ठेवून अनन्यभावने भगवंतांना साद घातली पाहिजे. भारतातील हिंदूची ही श्रद्धा ज्या दिवसापासून कमी होऊ लागली, जेव्हापासून त्यांच्या प्रार्थनेचा हा ध्वनी क्षीण झाला, तेव्हापासून त्यांच्यावर दु:ख येऊ लागले आणि तेव्हापासूनच ते सन्मार्ग आणि सुखाच्या सुपथापासून भ्रष्ट झाले. आता पुन्हा श्रद्धा आणि विश्वासासह भगवंताला हाक मारा. बघा आपले इहलौकिक दु:ख दूर होते की नाही ! आणि पहा, आपल्याला भगवंतांच्या अमृतमय दयेमुळे भगवंतांच्या दुर्लभ चरणकमलांची प्राप्ती सहजपणेच होते किंवा नाही ते !

*****

# भगवंतांचा विसर कधीही न व्हावा

मानवाच्या बाबतीत एक गोष्ट सर्वात उत्तम आहे ती ही की, त्याने एक क्षणभरसुद्धा भगवंताला विसरू नये. जो मनुष्य हा नियम स्वत:च धारण करतो की, 'मी एक क्षणभर देखील भगवंताला विसरणार नाही' आणि त्याचे पालनही करतो, त्याला ह्याच जन्मी भगवत्प्राप्ती होण्यात संशयाला थोडी सुद्धा जागा नाही. भगवंत गीतेत म्हणतात -

**अनन्यचेताः सततं यो मां स्मरति नित्यशः ।**
**तस्याहं सुलभः पार्थ नित्ययुक्तस्य योगिनः ।।**

(८ । १४)

'हे अर्जुना ! जो पुरुष माझ्या ठिकाणी अनन्यचित्त होऊन सदैव अखंडपणे पुरुषोत्तम अशा माझे स्मरण करतो. सदैव निरंतर माझ्याशी जोडलेल्या अशा त्या योग्याला मी सुलभ आहे, अर्थात मी त्याला सहजपणे प्राप्त होतो.'

भगवंतांच्या ह्या घोषणेवर विश्वास ठेवून असा निश्चय केला पाहिजे की, 'ह्या क्षणापासून मरेपर्यंत जाणून बुजून मी भगवंतांना विसरणार नाही.' असा निश्चय खरा ठरल्यावर भगवंत त्याला मदत करतात आणि शेवटी त्या भक्ताची इच्छा पूर्ण करतात. कधीतरी त्याची चूक जरी झाली तरी भगवंत त्याला क्षमा करतात. कोणी जरी असे म्हटले की "अठरा तास मनुष्य भगवंतांचे स्मरण करतो परंतु झोपेच्या वेळेतील सहा तास स्मरण करणे ही तर त्याच्या हातातील गोष्ट नाही." तेव्हा या बाबतीत असा नियम आहे की, जागेपणी मनुष्य जे काम करतो, स्वप्नावस्थेत त्याचे मन बहुधा त्याच आठवणीत लीन होते. असे दिसून येते की, जागृत अवस्थेत जे भगवंतांचे स्मरण करतात, स्वप्नात देखील त्यांना भगवंतांचीच आठवण येते. एवढेच नव्हे तर जे लोक झोपण्यापूर्वी काही वेळ भगवंतांचे स्मरण

करतात आणि स्मरण करता करता निद्राधीन होतात, त्यांना देखील बहुधा भगवद्विषयकच स्वप्ने पडतात. म्हणून असा प्रयत्न केला पाहिजे की, जागेपणी भगवंताचे स्मरण न सुटावे. जाणून बुजून भगवंतांना एक क्षणभर सुद्धा विसरता कामा नये; कारण ज्या क्षणी आपण भगवंतांना विसरतो त्यावेळी आपले मन पशु-पक्षी, कीट-पतंग, मनुष्य, देवता इत्यादींच्या चिंतनात गढले आणि योगायोगाने त्याच क्षणी प्राण निघून गेले तर आपण केलेल्या चिन्तनाप्रमाणे आपल्याला पशु-पक्षी इत्यादी योनीच प्राप्त होईल. भगवंतांनी सुद्धा म्हटले आहे -

**यं यं वापि स्मरन्भावं त्यजत्यन्ते कलेवरम् ।**
**तं तमेवैति कौन्तेय सदा तद्भावभावितः ।।**

(गीता ८ । ६)

'हे कुन्तीपुत्र अर्जुना ! हा मनुष्य अन्तकाली ज्या ज्या भावनेचे स्मरण करतांना शरीराचा त्याग करतो, त्या त्या भावालाच तो प्राप्त होतो; कारण तो नेहमी त्याच भावनेने भावित असतो.'

मानवजीवनाची केवढी ही हानी आहे. मानवी जीवनप्राप्तीच्या दुर्लभतेविषयी विचार केल्यास ह्या हानीच्या भयानकतेची थोडी कल्पना येऊ शकते. चौऱ्यांशी लक्ष योनींतून भ्रमण करता करता जीवात्मा जेव्हा अत्यंत दुःखी होतो तेव्हा त्याच्यावर विशेष कृपा करून भगवंत त्याला मानवदेह प्रदान करतात-

**कबहुँक करि करुना नर देही । देत ईस बिनु हेतु सनेही ।।**

(रा० च० मा०, उत्तर ४४ । ३)

असे दुर्लभ मानवी जीवन व्यर्थ जाऊ नये यासाठी भगवंत उपाय सांगतात -

**तस्मात्सर्वेषु कालेषु मामनुस्मर युध्य च ।**
**मय्यर्पितमनोबुद्धिर्मामेवैष्यस्यसंशयम् ।।**

(गीता ८ । ७)

'म्हणून हे अर्जुना ! तू सर्व काळी नेहमी माझेच स्मरण कर

आणि युद्धही कर. अशाप्रकारे माझ्या ठिकाणी अर्पण केलेल्या मन-बुद्धीने युक्त होऊन निःसंशय मलाच प्राप्त होशील.

भगवंतांनी स्मरणाविषयी प्रामुख्याने सांगितले आहे; युद्ध करणे ही गोष्ट गौणरूप आहे. यावरून ही गोष्ट स्पष्ट होते की, भगवंतांचे स्मरण एक क्षणभर देखील सुटता कामा नये; नाहीतर मानवी जीवन व्यर्थ होऊ शकते.

जे लोक भगवंतांच्या ठिकाणी आपले चित्त जडवितात त्यांना नक्कीच भगवत्प्राप्ती होते -

**तेषां सततयुक्तानां भजतां प्रीतिपूर्वकम् ।**
**ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयान्ति ते ।।**

(गीता १० । १०)

'सदैव माझ्याच ध्यान इत्यादींमध्ये मग्न असलेल्या आणि प्रेमाने भजन करणाऱ्या त्या भक्तांना मी अशा प्रकारचा तत्त्वज्ञानरूपी योग देतो की ज्यामुळे ते मलाच प्राप्त होतात.'

म्हणून भगवंतांनी अर्जुनाला आदेश दिला -

**मय्येव मन आधत्स्व मयि बुद्धिं निवेशय ।**
**निवसिष्यसि मय्येव अत ऊर्ध्वं न संशयः ।।**

(गीता १२ । ८)

'माझ्याच ठिकाणी चित्त एकाग्र कर आणि माझ्याच ठिकाणी बुद्धी जोडून ठेव; त्यानंतर तू माझ्यातच निवास करशील यात काहीच शंका नाही.'

भगवंत जर एवढे खात्रीपूर्वक आश्वासन देतात तर मग आपले मन आणि बुद्धी काय कामाचे? त्या दोघांनाही याच क्षणापासून भगवंतांच्या कामाला जोडून दिले पाहिजे.

भगवंतांच्या ठिकाणी बुद्धीला जोडणे म्हणजे असे आहे की, परमात्मा सर्व ठिकाणी समभावाने आणि विज्ञान आनंदरूपाने विराजमान आहेत, सर्व ठिकाणी आनंदच आनंद भरलेला आहे. आनंदाव्यतिरिक्त

आणखी काहीच नाही. अशाप्रकारे ध्यानात स्थिर होणे, अशा प्रकारच्या ध्यानाचे फळ म्हणजे विनासायास भगवंतांची प्राप्ती होते. बुद्धीत देखील अगदी चांगल्या प्रकारे असा निश्चय झाला पाहिजे की, सर्व ठिकाणी, आपल्या वर-खाली, आत-बाहेर सर्वत्र समभावाने निराकाररूप असा केवळ एक परमात्माच आहे.

बुद्धीच्या अशा निश्चयामुळे मनाने मनन करणे म्हणजे मनाला भगवंतांच्या ठिकाणी लावणे होय. याचे फळ देखील परमात्माप्राप्तीतच आहे.

भगवंतांव्यतिरिक्त कोणत्याही वस्तूचे चिंतन करणे म्हणजे आपण स्वत:ला गळफास लावून मरण्यासारखेच आहे; कारण त्यामुळे आपले मानवीजीवन नष्ट होते. मौल्यवानातील मौल्यवान वस्तूचे चिंतन सुद्धा आपल्याला परमेश्वराची प्राप्ती करून देऊ शकत नाही. म्हणून मोठ्या तत्परतेने अशी सवय लावून घेतली पाहिजे की, भगवंतांव्यतिरिक्त मन इतर कोणत्याही वस्तूच्या चिंतनात लागणारच नाही. काळ अत्यंत मौल्यवान आहे. मानवी जीवनासाठी मोजलेली श्वाससंख्या आपल्याला मिळाली आहे. लाख रुपये खर्च केले तरी त्यापेक्षा अधिक एक मिनिटभर वेळ सुद्धा मिळू शकत नाही. मानवी जीवनातील एक क्षणाच्या किंमतीचे देखील आकलन होत नाही, कारण भगवच्चिंतन केल्यामुळे तो क्षण भगवंतांची प्राप्ती करून देऊ शकतो. मग संपूर्ण मानवी जीवनाची तर गोष्टच कशाला? मानवी जीवनाचे महत्त्व यातच आहे. ते भगवत्प्राप्तीचे कारण होऊ शकते. इतर कोणत्याही योनीमध्ये हे शक्य नाही. म्हणून मानवी जीवनातील वेळ खर्च करण्यात फार मोठी सावधगिरी बाळगली पाहिजे. परमात्म्या व्यतिरिक्त इतर दुसऱ्या कामांमध्ये वेळ खर्च करणाऱ्यांना संतांनी मूर्ख असे म्हटले आहे.

संसारातील वस्तूंचा संग्रह करण्यात घालविलेला वेळ सुद्धा व्यर्थ आहे. समजा की एका महिन्यात आपली मिळकत एक लाखाची

आहे. बारा महिन्यात बारा लाखांची झाली तर कोणता हेतू सिद्ध झाला? पैशांच्या थैल्या इथेच राहातील, जीवाला एकट्यालाच जावे लागेल. हे, पैसे गोळा करण्यासाठी जी पापकर्मे त्याने केली आहेत; ती नक्कीच त्याच्या बरोबर राहतील, म्हणून पैसे साठविण्याच्या बाबतीत दोन गोष्टी लक्षात ठेवल्या पाहिजेत - धनसंचयासाठी भगवंतांना विसरता कामा नये आणि संग्रह करताना पापाश्रयही घेता कामा नये. मृत्यूनंतर पैशांशी आपला काहीही संबंध राहणार नाही. ओझी वाहून वाहून गाढव मातीचा ढीग गोळा करते; भगवंतांना विसरून पैसे जमा करणे अगदी असेच आहे. मेल्यानंतर गाढवाला त्या मातीचा ना उपयोग होतो आणि ना आपले पैसे आपल्या उपयोगी पडतात. ह्या न्यायानुसार मानवी जीवनाचा वेळ संपत्ती गोळा करण्यात का बरे उद्ध्वस्त केला जावा?

काही बांधव ह्या शरीराचे पोषण करण्यात वेळ खर्च करतात. नाशवंत शरीराच्या पोषणासाठी वेळ देणे देखील त्याचा अपव्यय आहे. विशेष प्रकारचे खाणे-पिणे, सावधगिरी इत्यादींमुळे शरीराचे दहा शेर मांस वाढले तर काय झाले? शेवटी तर मरावेच लागेल. शरीर जास्त जड झाले तर प्रेत देखील जड होईल. शव वाहून नेणारे असेच म्हणतील की, 'प्रेत फारच जड आहे.' ह्या स्थूलत्वाने आणखी काय होणार? स्थूल शरीर जळल्यानंतर एक दोन शेर राख जास्त होईल. प्रेताच्या राखेचा काय उपयोग? कोणाच्यातरी डोळ्यात जाऊन ती त्याला त्रासदायक होऊ शकते. म्हणून शरीर पुष्ट करण्यासाठी वेळ देण्यात काहीही फायदा नाही.

कुटुंबाचे पोषण करताना सुद्धा भगवंतांना विसरून ममता आणि आसक्तीयुक्त होऊन वेळ देऊ नये, कारण कुटुंबावरील आसक्ती अधिक दुःखदायक असते. अनंत काळापासून कुटुंब आपल्याला धोका देत आले आहे. यापूर्वी सुद्धा आपण कोणत्यातरी कुटुंबात होतो. आता आपल्याला त्याची काही आठवण तरी आहे का? आपल्याला आता काहीच आठवत नाही की, पूर्वजन्मी आपण कोठे होतो?

आपले कुटुंब कोणते होते? अशाप्रकारे येथून निरोप घेतल्यानंतर ह्या कुटुंबाची सुद्धा आठवण राहाणार नाही. शंभर-दोनशे वर्षांनंतर तर हे कुटुंब कुठेच्या कुठे निघून जाईल, काहीच पत्ता नसतो. म्हणून मृत्युबरोबरच ज्याचा संबंध अगदीच तुटून जाणार आहे, त्या आपल्या कुटुंबावर मोह-ममता ठेवून भगवंतांना विसरणे आणि त्याच्या पालन पोषणात आपला वेळ नाहीसा करणे म्हणजे मानवी-जीवनाचा दुरुपयोग आहे.

जर आपण घर बांधण्यासाठी आपला वेळ खर्च करत असलो आणि भगवंतांना विसरलो तर हा सुद्धा मूर्खपणाच आहे. घर बांधले तरी न जाणो त्याचा उपभोग कोण घेईल? ज्याला घराची आवश्यकता असेल तो आपण स्वतःच घर बांधेल. खोटे खरे करून आपण आपले मानवी जीवन घर बांधण्यात का बरे लावावे? अशाच प्रकारे जगातील इतर वस्तूंच्या बाबतीत जाणले पाहिजे. जगातल्या, ज्या ज्या वस्तूंना आणि व्यक्तींना आपण आपले म्हणून समजतो, त्या आपल्या नाहीत; त्यांच्याशी आपला नक्कीच वियोग होणार आहे. म्हणून त्यांचा संग्रह आणि संरक्षण करण्यात भगवंतांना विसरून जाणे योग्य नाही. परमात्म्याच्या प्राप्तीसाठी अध्यात्माच्या दृष्टीने केल्या जाणाऱ्या कर्मांव्यतिरिक्त बाकी सगळी कर्मे व्यर्थ किंवा अनर्थकारक आहेत. हे मानवी जीवन आत्मकल्याणासाठीच प्राप्त झाले आहे, व्यर्थ उपभोगांसाठी नव्हे. स्वर्गसुखाच्या उपभोगांसाठी प्रयत्नशील असणे देखील व्यर्थ आहे. **'स्वर्गउ स्वल्प अंत दुखदाई ।'** म्हणून आत्मकल्याणाला सहाय्यक होणाऱ्या कामाव्यतिरिक्त इतर कोणत्याही कार्याला लागणे हा मूर्खपणा होय. क्षणाक्षणाला आयुष्य खर्च होत आहे. म्हणून ज्या कामासाठी आपण आलेलो आहोत ते त्वरित करून घेतले पाहिजे. काळाचा भरवसा नाही. एका क्षणानंतर काय घडणार आहे, कुणीही सांगू शकत नाही. अशा परिस्थितीत एका क्षणासाठी सुद्धा भगवंतांना विसरणे धोक्याहून कमी नाही.

जगातील ज्या ज्या वस्तूंशी आपला संबंध आहे, त्यांचा नक्कीच वियोग होणार आहे. ह्या शरीराचे सर्व संबंध काल्पनिक आणि नाशवंत आहेत; असे समजूनच त्यांच्या मोह-ममतेला प्रथम पासूनच अंतर्भूत केले तर उत्तमच आहे. वर सांगितल्या प्रकारे आपण विचारपूर्वक साधना केली तर आपण मुक्त होऊन जाऊ आणि जर साधना केली नाही आणि निरुपायाने आपल्याला संबंध तोडावे लागले तर आपण भटकत राहू, जो जन्मला आहे त्याला नक्कीच मरावे लागेल. लाखो प्रयत्न करून सुद्धा मृत्यूपासून सुटका नाही होऊ शकत. म्हणून ज्या कार्यासाठी आलेलो आहोत, ते अवश्य केले पाहिजे, नाहीतर पुढे घोर पश्चात्ताप करावा लागेल. गोस्वामी तुलसीदास म्हणतात -

**सो परत्र दुख पावइ सिर धुनि धुनि पछिताइ ।**
**कालहि कर्महि ईस्वरहि मिथ्या दोस लगाइ ।।**

(रा० च० मा०, उत्तर० ४३)

'जो मनुष्य ह्यावेळी सावध होत नाही, त्याला पुढे डोके आपटून आपटून भयंकर पश्चाताप करावा लागेल. तो मूर्ख त्यावेळी काल, कर्म आणि ईश्वर यांना खोटा दोष देईल.' तो हेच म्हणेल - 'कलियुगामुळे मी आत्मकल्याण करू शकलो नाही. माझे कर्मच असे होते. माझ्या भाग्यात हीच गोष्ट लिहिली होती. ईश्वराने साहाय्य केले नाही इत्यादी इत्यादी.' त्याचे हे रडणे व्यर्थ आहे- खोटे आहे. म्हणून आतापासूनच सावध झाले पाहिजे.

परमात्म्याची प्राप्ती आपण स्वतः केल्यानेच होईल. दुसरा कुणीही आपले हे काम करू शकणार नाही. संसारातील इतर काही कार्य शिल्लक राहिले तर आपल्या पश्चात आपले उत्तराधिकारी किंवा दुसरे लोक करून टाकतील; पण परमात्म्याच्या प्राप्तीत मात्र उणीव राहिली तर आपल्याला पुनः जन्म घ्यावा लागेल, म्हणून जे कार्य आपण केल्यानेच होईल, दुसऱ्यांकडून नव्हे आणि जे करणे आवश्यक आहे त्यासाठी वेळ दिला पाहिजे.

जगातील सगळे संबंध खोटे आहेत, स्वप्नाप्रमाणे आहेत, केवळ माया आहे, स्वप्नातील जगात जे काही घडते ते सगळे खरेच वाटते परंतु वास्तवात ते सत्य नसते. डोळे उघडल्यानंतर ते जगही शिल्लक राहात नाही, शरीरही नाही आणि तो व्यवहारही नाही. अशाच प्रकारे जगात जेवढे आपले संबंध आहेत, ते सगळे शरीरामुळे आहेत. शरीर शांत झाल्यावर ह्यांच्याशी आपला काहीच संबंध राहाणार नाही. म्हणून ह्या संबंधांचा त्याग आपण प्रथम पासूनच मनाने करावा की ज्यामुळे पुढे पश्चाताप होणार नाही.

जोपर्यंत मानवी जीवन असते तोपर्यंत सर्व काही होऊ शकते. परमात्म्याला शरण जाऊन मनुष्य जे पाहिजे ते प्राप्त करून घेऊ शकतो. कठोपनिषदात यमराजाने नचिकेत्याला हीच गोष्ट सांगितली आहे की, 'हे नचिकेत ! ॐ हे जे परमात्म्याचे नाम आहे, हेच साक्षात् ब्रह्म आहे, हेच सगुण आणि निर्गुण आहे. त्याला शरण गेल्यावर जे पाहिजे तेच मिळू शकते.'

म्हणून आपण देखील भगवंतांना शरण जाऊन जे पाहिजे ते करू शकतो. दुसरी गोष्ट अशी की भगवत्प्राप्तीशिवाय दुसरी कोणतीही इच्छा करू नये. दुसऱ्या कोणत्याही गोष्टीची इच्छा करणे मूर्खपणा होय. जगातल्या ज्या काही वस्तू आहेत त्या सगळ्या प्रारब्धाच्या आधीन आहेत. कोणी इच्छा करेल की मी शंभर वर्षे जगेन तर ते अशक्य आहे. ह्याच प्रमाणे कोणी अशी इच्छा करेल की मला आताच मरण यावे तर इच्छा करण्याने मरण सुद्धा येऊ शकत नाही. जेव्हा जसे प्रारब्ध असेल तसेच घडेल. म्हणून इच्छा करणे मूर्खपणा आहे. हाच प्रकार भोग आणि वस्तूंच्या प्राप्ती विषयी जाणला पाहिजे. प्रारब्धाधीन जेवढे मिळणार आहे, तेवढेच मिळेल; इच्छा करून नव्हे.

भगवंतांची प्राप्तीच इच्छेमुळे होते. तेथे इच्छा यथेष्ट तीव्र आणि अनन्य व्हावी की जेथे भगवत्प्राप्तीच होईल. भगवंतांशिवाय इतर कोणत्याही वस्तूची प्राप्ती आपल्या इच्छेवर अवलंबून नाही.

जगातील सगळेच प्राणी सुखाची इच्छा करतात, दुःखाची नाही; परंतु दुःखाची प्राप्तीच अधिक प्रमाणात होते. म्हणून अचेतन वस्तूंसाठी इच्छा करणे मूर्खपणा होय. इच्छा केल्यामुळे प्रापंचिक वस्तू मिळत नाहीत. त्यासाठी पूर्वी केलेल्या कर्मानुसार फलस्वरूप प्रारब्ध असावे लागते पण ते आपल्या हातात नाही. परंतु भगवत्प्राप्तीची तीव्र इच्छा केल्यास ते नक्कीच प्राप्त होऊ शकतात. म्हणून भगवत्प्राप्तीची इच्छा करायला पाहिजे आणि ती यथेष्ट तीव्र आणि अनन्य होण्यासाठी प्रयत्न केला पाहिजे.

भगवत्प्राप्तीसाठी जो उशीर होत आहे त्यात कसूर आपलीच आहे. भगवंत तर आपल्याला भेटण्यासाठी आतुर आहेत; फक्त आपल्या ठिकाणी तशी इच्छा असली पाहिजे. भगवंत भेटीची इच्छा जागृत होण्यासाठी एकांतात बसून करुणभावपूर्वक मन मोकळे करून रडले पाहिजे. आपल्या अपराधांचे स्मरण करून सद्‌गदित होऊन भगवंतांची प्रार्थना केली पाहिजे, 'हे प्रभो ! आपल्याशिवाय या जगात माझे कोण आहे? हे नाथ ! मी शरणागत आहे, आपण माझे रक्षण करा.' भगवंत अतिशय दयाळू आहेत; आपल्या सन्मुख होणाऱ्या मानवाच्या अनंत जन्मांच्या पापांना त्याच क्षणी क्षमा करून टाकतात.

आपण आपल्या आत्म्याची उन्नती उत्तरोत्तर अधिक तीव्रपणे केली पाहिजे. काल आपण जी साधना केली, त्यापेक्षा आज अधिक तीव्र केली पाहिजे, आजच्या पेक्षा उद्या ती अधिक तीव्र असली पाहिजे. अशाप्रकारे सकाळपेक्षा दुपारी, दुपारपेक्षा संध्याकाळी, संध्याकाळपेक्षा रात्री आणि रात्रीपेक्षा दुसऱ्या दिवशी सकाळच्या साधनेत क्रमशः तीव्रता असली पाहिजे. तासा तासानंतर, क्षणा क्षणानंतर साधनेत उत्तरोत्तर तीव्रता असली पाहिजे. जर अशा प्रकारचा प्रयत्न केला तर परमात्म्याची प्राप्ती होण्यास विलंब होऊ शकणार नाही.

कोणीतरी म्हटले आहे - **'पाय परमपद हाथ सों जात, गयी सो गयी अब राख रही को ।'** प्राप्त झालेले परमपद हातातून जात आहे.

खरोखरच मानवी जीवन व्यर्थ दवडणे म्हणजे परमपद हातातून निघून जाण्यासारखे आहे. म्हणून जीवनातला जो काळ निघून गेला तो निघून गेला; परंतु आता एक क्षण देखील परमेश्वराच्या स्मरणाशिवाय जाता कामा नये. नेहमी दक्ष असले पाहिजे. पूर्ण तत्परता केली तर आयुष्यातील जेवढा काळ उरलेला आहे. तोही पुरेसा आहे. एवढ्या वेळातच भगवत्प्राप्ती होऊ शकते. जर त्यात काही उणीव राहिली तरी भीतीचे काहीच कारण नाही. पुढचा जन्म मिळताच कल्याण होते; कारण की तो मनुष्य ज्ञानवान योगी लोकांच्या कुळात जन्म घेतो* आणि त्याच्या चिंतनात स्वाभाविकपणेच भक्ती, ज्ञान, वैराग्य असते. तेथे सत्संगतीमुळे त्याचे मन सतत उन्नती करीत जाते आणि शेवटी तो परमात्म्याला प्राप्त करून घेतो.

उदाहरणार्थ एक टेपरेकॉर्डर आहे. त्याच्या समोर जसा ध्वनी उच्चारला तसे त्याचे रेकॉर्डिंग केले जाते. आता ते यंत्र जेथे जाते तेथे त्याच्याबरोबर तो शब्दध्वनी सुद्धा जातो. अशाप्रकारे आपल्या जीवनात जी जी कर्मे घडतात ती संस्काररूपाने अंत:करणात एकत्रित होतात आणि मृत्यूनंतर ती आपल्या बरोबर जातात. पुढील जन्मी हे चांगले - वाईट संस्कार मनाच्या स्फुरणाचे कारण बनतात. म्हणून जीवनातील निरनिराळ्या कर्मातून हृदयात जे वाईट संस्कार संघटित होत आहेत, त्यांना मृत्यूपूर्वीच धुवून टाकले पाहिजे. साबण आणि पाणी यांनी जसे वस्त्र धुवून स्वच्छ करतात, त्याप्रमाणे अंत:करणात जो राग-द्वेष आणि पापरूपी मळ गोळा झाला आहे, त्याला भगवन्नामरूपी साबणाने आणि निष्काम - भावरूपी पाण्याने स्वच्छ केले पाहिजे. बुद्धीत आणि मनात उत्तम गोष्टींचा संग्रह केला पाहिजे. बुद्धिच्या ठिकाणी जे ज्ञान आहे ते म्हणजे उत्तम संग्रह होय. परमेश्वरविषयक ज्ञान म्हणजेच यथार्थ ज्ञान होय. म्हणून

---

*** अथवा योगिनामेव कुले भवति धीमताम् । (गीता ६ । ४२ चा पूर्वार्ध)**

बुद्धिच्या ठिकाणी धृती, क्षमा, शांती, समता, संतोष, ज्ञान वैराग्य - ह्या सात्त्विक भावांचा संग्रह केला पाहिजे. मनात भगवंतांच्या स्वरूपाचे चिंतन तसेच भगवंतांचे गुण, प्रभाव, तत्त्व आणि रहस्याविषयींच्या गोष्टी संघटित केल्या पाहिजेत. भगवंतांचे नाम, रूप, लीला आणि धाम यांचे मनन केले पाहिजे. इंद्रियांना तपश्चर्येच्या द्वारे तापवून शुद्ध केले पाहिजे. नंतर मनाने इंद्रियांच्याद्वारे भगवंतांचे दर्शन, भगवंतांबरोबर संवाद, भगवंतांचा स्पर्श इत्यादी केले पाहिजे. म्हणजेच मनाने असे कल्पिले पाहिजे की, भगवंत आपल्या समोर उभे आहेत, आपल्याकडे पाहात आहेत, आपण त्यांचे दर्शन घेत आहोत, त्यांच्या चरणांना हातांनी स्पर्श करीत आहोत त्यांच्या श्रीविग्रहातून बाहेर पडणारा सुगंध घेत आहोत, भगवंतांशी संभाषण करीत आहोत, भगवंतांची वाणी कानांनी श्रवण करीत आहोत.

प्रत्येक जीव हा भगवान नारायण स्वरूप समजून त्याची आपल्या हातांनी सेवा केली पाहिजे. वाणीने सत्य, प्रिय आणि हितकर असे बोल बोलले पाहिजेत. डोळ्यांनी भगवंत, संत किंवा उत्तम दृश्ये यांना पहावे. अशाप्रकारे प्रत्येक इंद्रियाला शुद्ध करून त्याच्यात अशा प्रकारचा भाव उत्पन्न केला पाहिजे की जो मोक्षाला साहाय्य करील. जरी ह्या जन्मी काम झाले नाही तरी उत्तम संस्कार तर आपल्याबरोबर जातील. निष्काम भावनेने हे सगळे करणे अत्यंत हितकारक आहे. सावधपणे या सर्वांचा अभ्यास केल्यामुळे हृदयात जे दुर्गुण, दुराचार, दुर्व्यसने, मल, विक्षेप, आवरण, निद्रा, आळस, प्रमाद इत्यादी वाईट संस्कार आहेत ते अत्यंत लवकर आणि संपूर्णपणे धुतले जातात तसेच हृदय भक्ती, ज्ञान, वैराग्य, सदाचार आणि सद्‌गुणांनी भरून जाते. खरे पाहता दैवी संपत्ती तसेच शरीर, वाणी आणि मन यांचे तप - ही अमृततुल्य आहेत, आणि राजस तसेच तामस हे भाव विषसमान आहेत; त्यांच्यामुळे मनुष्याचे पतन हे निश्चित ठरलेले आहे.

सर्वात उत्तम तसेच सर्वात सोपे साधन म्हणजे भगवच्चिंतन होय. भगवंतांचे चिंतन प्रेमपूर्वक सदैव केले पाहिजे. जरी प्रेम नसले तरी सुद्धा भगवच्चिंतन हृदयाला शुद्धच करते. भगवंतांचे चिंतन जरी कोणी वैरभावनेने, द्वेषाने किंवा भीतीने करीत असेल तरी त्याचे ही कल्याण होते. मारीचाने भगवान श्रीरामांचे चिंतन भयाने केले, तरी त्याचा उद्धार झाला. कंसाने द्वेषभावाने भगवंतांचे चिंतन केले तरी त्याचे कल्याण झाले. मग जो प्रेमपूर्वक करुण भावाने भगवंतांचे चिंतन करील तर त्याच्या कल्याणाच्या बाबतीत काय सांगावे? वृंदावनातील गोपींचे प्रत्यक्ष उदाहरण आहे. गोपींनी प्रेमपूर्वक करुण भावाने भगवंतांचे चिंतन केले, तेव्हा त्यांच्या उद्धाराबद्दल तर काय सांगावे? म्हणून मन जेथे जेथे जाईल तेथे भगवंतांनाच पाहावे. रात्री भगवच्चिंतन करता करताच निद्राधीन व्हावे. रात्री जेव्हा जेव्हा झोपमोड होईल, जेव्हा जेव्हा उठावे लागेल, तेव्हा तेव्हा चिंतन होते आहेना हे मनाच्या दक्षतेने पाहिले पाहिजे.

एकांतात जप-साधना करण्यासाठी बसताना सुरुवातीला भगवंतांची स्तुती - प्रार्थना अर्थ आणि भाव जाणून अवश्य करावी. गीता, रामायण इत्यादींचा स्वाध्याय अर्थ आणि भाव जाणून श्रद्धापूर्वक निष्काम भावाने केला पाहिजे. त्यानंतर सत्संग करावा. वेदातून आपल्याला प्रेरणा मिळते -

**उत्तिष्ठत जाग्रत प्राप्य वरान्निबोधत ।**

(कठ० १ । ३ । १४)

'उठा, जागे व्हा आणि महापुरुषांजवळ जाऊन त्यांच्याकडून जागण्यास योग्य अशा परमतत्त्वाला जाणून घ्या.'

वेळ आहे तोच सावध होणे योग्य आहे, नाही तर

**समय चुकें पुनि का पछिताने ।**

मृत्यु शिरावर येऊन बसेल, त्यावेळी काहीही उपाय होणार नाही. श्री तुलसीदासांनी किती कडक शब्दात इशारा दिला आहे -

**जो न तरै भव सागर नर समाज अस पाइ ।**
**सो कृत निंदक मंदगति आत्माहन गति जाइ ।।**

'जो मनुष्य उत्तम देश, उत्तम जात, उत्तम काल, उत्तम धर्म, उत्तम संग - या सर्वांचा सुंदर सुयोग मिळूनही संसार सागराला पार करीत नाही तो निंदेला पात्र असा मूर्ख असतो. आत्महत्या करणाऱ्याला जी गती प्राप्त होते तीच त्याला सुद्धा मिळते.'

श्री नारायण स्वामी म्हणतात -

**दो बातन को भूल मत जौ चाहै कल्याण ।**
**नारायण इक मौत को दूजे श्रीभगवान ।।**

'जर आपले कल्याण साध्य करण्याची इच्छा करीत असाल तर दोन गोष्टी विसरू नका - एक मृत्यु आणि दुसरी म्हणजे श्रीभगवंत.'

भगवंतांचे स्मरण ठेवल्यामुळे पापांचा नाश होऊन कल्याणाची प्राप्ती होते आणि मृत्यूचे स्मरण ठेवल्यामुळे पुढे पाप घडत नाही.

अधिक काहीच होत नसेल तर भगवंतांचे जे कोणतेही नाम आवडत असेल ते सदा सर्वदा म्हणत राहा - तेच आपले कल्याण करील -

**केशव केशव कूकिये नहिं कूकिये असार ।**
**रात दिवस की कूक तें कबहुँ तो सुने पुकार ।।**

* * * * *

# श्रीमद्भगवद्गीतेतील भक्तियोग

श्रीमद्भगवद्गीता सर्व शास्त्रांचे विशेषत: उपनिषदांचे सार आहे. स्वत: श्री वेदव्यासांनी महाभारतातील भीष्मपर्वात म्हटले आहे -

**गीता सुगीता कर्तव्या किमन्यैः शास्त्रसंग्रहैः ।**
**या स्वयं पद्मनाभस्य मुखपद्माद् विनिस्सृता ।।**
**सर्वशास्त्रमयी गीता सर्वदेवमयो हरिः ।**
**सर्वतीर्थमयी गङ्गा सर्ववेदमयो मनुः ।।**

(४३ । १-२)

'फक्त गीतेचेच उत्तम प्रकारे गायन (श्रवण, कीर्तन, पठन, पाठन, मनन आणि धारण) केले पाहिजे; इतर शास्त्रांची काय आवश्यकता आहे; कारण की ती स्वत: पद्मनाभ भगवंतांच्या साक्षात मुखकमलातून निर्माण झाली आहे. गीता सर्वशास्त्रमयी आहे, श्रीहरी सर्वदेवमय आहेत, श्रीगङ्गा सर्वतीर्थमयी आहे आणि मनुस्मृती सर्ववेदमयी आहे.

एवढेच नव्हे तर स्वत: भगवंतांनी सुद्धा असे म्हटले आहे की सर्व शास्त्रांमध्ये जे सांगितले आहे तेच तू इथे माझ्याकडून ऐक -

**ऋषिभिर्बहुधा गीतं छन्दोभिर्विविधैः पृथक् ।**
**ब्रह्मसूत्रपदैश्चैव हेतुमद्भिर्विनिश्चितैः ।।**

(गीता १३ । ४)

'हे तत्त्व अनेक प्रकारांनी ऋषींकडून वर्णन केले गेले आहे आणि वेदमंत्रांद्वारे देखील विभागपूर्वक त्याचे निरुपण केले गेले आहे. तसेच उत्तम प्रकारे निश्चित केलेल्या युक्तियुक्त ब्रह्मसूत्रातील पदांद्वारे देखील सांगितले गेले आहे.'

म्हणून आपण गीतेचे उत्तम प्रकारे अध्ययन आणि मनन केले

पाहिजे; कारण की मनन केल्यामुळे त्यात भरून राहिलेल्या गुप्त तत्त्वाचा शोध लागतो. आता या ठिकाणी गीतेत वर्णन केलेल्या भक्तिविषयी थोडसा विचार केला आहे -

गीता ही भक्तीने परिपूर्ण आहे. गीतेत काही ठिकाणी भेदोपासनेचे वर्णन आहे तर काही ठिकाणी अभेदोपासनेचे वर्णन आहे. अनेक संत सांगतात की, पहिल्या सहा अध्यायात कर्मयोगाचे, मधल्या सहा अध्यायात भक्तियोगाचे आणि अन्तीम सहा अध्यायात ज्ञानयोगाचे प्राधान्य आहे. पहिल्या सहा अध्यायात कर्मयोग आणि शेवटच्या सहा अध्यायात ज्ञानयोगाचे प्राधान्य आहे हे मान्य होऊ शकते; परंतु सातव्या अध्यायापासून बाराव्या अध्यायापर्यंत तर भक्तीच भक्ती भरलेली आहे; म्हणून या सगळ्या अध्यायांना भक्तियोगच म्हटले तर त्यात अतिशयोक्ती नाही; कारण की त्यातील बऱ्याचशा अध्यायात तर सगुण-साकार आणि सगुण-निराकाराचे वर्णन आहे, काही काही ठिकाणी निर्गुण-निराकाराच्या उपासनेचाही उल्लेख आहे. ह्या सहाही अध्यायात एकंदर दोनशे नऊ श्लोक आहेत. त्यात जे एक गुप्त रहस्य आहे त्याचे येथे मार्गदर्शन केले आहे.

ह्या सर्व श्लोकांकडे लक्षपूर्वक पाहिले तर लक्षात येते की बहुधा प्रत्येक श्लोकात कोणत्या ना कोणत्या रूपात भगवद्वाचक पद आले आहे. जेथे भगवान श्रीकृष्णांची वचने आहेत तेथे तर **अहम्, माम्, मया, मत्तः, मम, मे, मयि** आणि **अस्मि** इत्यादी शब्दांचा प्रयोग केला आहे आणि अर्जुनाच्या शब्दांमध्ये **त्वम, त्वाम्, त्वया, त्वत्तः, तव, ते, भवान्** आणि **असि** तसेच जनार्दन, पुरुषोत्तम, देव, देवेश, जगन्निवास इत्यादी शब्दांचा प्रयोग आढळतो. अशाप्रकारे संजयाच्या वचनांमध्ये देखील स्पष्टपणे हरी, देव, देवदेव, केशव, कृष्ण, वासुदेव इत्यादी भगवद्वाचक शब्द आले आहेत. जास्तीत जास्त शब्द तर सगुण-साकार आणि सगुण-निराकाराचा निर्देश करणारे आहेत. परंतु कितीतरी शब्द निर्गुण निराकारवाचक सुद्धा आहेत - उदा. ॐ, अक्षर, अव्यक्त,

ब्रह्म इत्यादी.

ह्या दोनशे नऊ श्लोकांमध्ये जास्तीत जास्त भगवंत द्योतक शब्दच आहेत, फक्त त्यांचा एक दशांश भाग म्हणजे एकवीस श्लोक असे आहेत की, ज्यांत भगवानवाचक शब्द नाहीत. परंतु ते देखील भाव आणि प्रकरणनुसार भक्तिपेक्षा वेगळे नाहीत. त्यापैकी आठव्या अध्यायात असे नऊ श्लोक आहेत, उरलेल्या पाच अध्यायातील प्रत्येकात दोन दोन किंवा तीन श्लोकांपेक्षा अधिक असे नाहीत. पाच अध्याय मिळून एकंदर बारा श्लोकच असे आहेत की, ज्यात उघड उघड भगवद्वाचक शब्द नाहीत - जसे सातव्या अध्यायातील विसावा आणि सत्ताविसावा, नवव्या अध्यायातील दुसरा, बारावा आणि एकविसावा; दहाव्यातील चौथा आणि सव्वीसावा, अकराव्यातील सहावा आणि दहावा. तसेच बाराव्यातील बारावा, तेरावा आणि अठरावा.

ज्यांच्यात कर्मयोगाचे प्राधान्य मानले गेले आहे त्या (एक ते सहा) अध्यायातील कोणताही अध्याय भक्तिवर्णनाशिवाय नाही. पहिल्या अध्यायात संजय आणि अर्जुन यांच्या बोलण्यात माधव, हृषीकेश, अच्युत, कृष्ण, केशव, मधुसुदन, जनार्दन, वार्ष्णेय इत्यादी भगवद्वाचक शब्द भक्तिभावाने ओथंबलेले असे आलेले आहेत. दुसऱ्या अध्यायातील एकसष्टाव्या श्लोकात तर भगवंतांना शरण गेल्याचा भाव स्पष्टच आहे -

**तानि सर्वाणि संयम्य युक्त आसीत मत्परः ।**
**वशे हि यस्येन्द्रियाणि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ।।**

'साधकाने संपूर्ण इंद्रियांना वश करून समाहितचित्त होऊन मला शरण येऊन ध्यानाला बसले पाहिजे; कारण की ज्या पुरुषाची इंद्रिये ताब्यात असतात त्याची बुद्धी स्थिर असते.'

अशाप्रकारे तिसऱ्या अध्यायातील तिसाव्या श्लोकात परमेश्वराच्या ठिकाणी झालेल्या चित्तलयामुळे सगळी कर्मे भगवंताला समर्पित करण्याचा भाव आहे -

**मयि सर्वाणि कर्माणि संन्यस्याध्यात्मचेतसा ।**
**निराशीर्निर्ममो भूत्वा युध्यस्व विगतज्वरः ।।**

'अंतरात्मा अशा माझ्या ठिकाणी झालेल्या चित्तलयाने संपूर्ण कर्मे मला अर्पण करून आशारहित, ममतारहित आणि संतापरहित होऊन युद्ध कर.'

चौथ्या अध्यायात तर स्वत: भगवंत म्हणतात की, मी साक्षात पूर्णब्रह्म परमात्मा आहे आणि श्रेष्ठपुरुषांच्या उद्धारासाठी, दुष्टांच्या विनाशासाठी आणि धर्मसंस्थापना करण्यासाठी वेळोवेळी अवतार घेतो -

**अजोऽपि सन्नव्ययात्मा भूतानामीश्वरोऽपि सन् ।**
**प्रकृतिं स्वामधिष्ठाय सम्भवाम्यात्ममायया ।।**

(गीता ४ । ६)

'मी अजात आणि अविनाशी स्वरूप असूनही तसेच सर्व प्राणिमात्रांचा ईश असूनही आपल्या प्रकृतीला आधीन करून आपल्या योगमायेने प्रकट होत असतो.'

**परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् ।**
**धर्मसंस्थापनार्थाय सम्भवामि युगे युगे ।।**

(गीता ४ । ८)

'सज्जनांचा उद्धार करण्यासाठी, पापकर्म करणाऱ्यांचा विनाश करण्यासाठी आणि धर्माची उत्तम प्रकारे स्थापना करण्यासाठी मी प्रत्येक युगात प्रगट होत असतो.'

ह्यानंतर भगवंतांनी आपल्या जन्म आणि कर्म यांचे दिव्यत्व जाणून घेण्याचे महत्त्व सांगितले आहे. जन्माचे दिव्यत्व हेच की भगवंतांचा जन्म अलौकिक आहे, मनुष्यमात्रांप्रमाणे पाप पुण्याच्या फलस्वरूपाने उत्पन्न झालेला नव्हे, - किंवा ते प्रकृतीच्या आधीनही नाहीत. ते केवळ उत्पन्न झालेले आणि विनष्ट झालेले दिसतात. मनुष्यप्राण्याप्रमाणे जन्म मृत्यू पावत नाहीत; म्हणून प्रत्यक्षात त्यांचे

जन्म-मरण होतच नसते, केवळ दृश्यभाव आणि नष्टभावच असतो. त्यांचे शरीर रोगशून्य, दोषरहित आणि चिन्मय असते. ते आपल्यावर मायेचे आवरण घालून घेतात त्यामुळे त्यांना कोणी ओळखू शकत नाही. (गीता ७ । २५) जो भक्त भगवंतांना शरण जाऊन श्रद्धा आणि प्रेमाने त्यांना भजतो, तोच त्यांचे यथार्थ रूप जाणतो. ते आपल्या इच्छेनुसार प्रकृतीला आपल्या ताब्यात ठेवून स्वतः अजन्मा आणि अविनाशी असून सुद्धा सज्जनांचे कल्याण करण्यासाठी व धर्म प्रचारासाठी आपल्या योगमायेने प्रकट होतात. (गीता ४ । ६, ८) हीच त्यांच्या जन्माची दिव्यता आहे. तसेच कर्मविषयीची दिव्यता अशी आहे की, त्यांच्या साऱ्या हालचाली अभिमान व आसक्ती कामनाविरहित केवळ जगाच्या कल्याणासाठीच असतात. (गीता ४ । १३ - १४). म्हणून त्यांची कर्मे दिव्य आहेत. अशाप्रकारे जाणून ह्या जाणिवेला आचरणात आणणे म्हणजेच भगवंतांच्या जन्म आणि कर्माच्या दिव्यत्वाचे तत्त्व-रहस्य जाणणे होय.

ह्या चौथ्या अध्यायात भगवंतांनी आपल्या भक्तिच्या महिम्यात येथपर्यंत सांगितले आहे की, -

**ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम् ।**

(गीता ४ । ११ चा पूर्वार्ध)

'जे भक्त मला ज्या प्रकारांनी भजतात, त्याच प्रकारे मी देखील त्यांना भजतो.'

पाचव्या अध्यायातील शेवटच्या श्लोकात तर भगवंतांनी आपले स्वरूप, प्रभाव आणि गुणांचे तत्त्व जाणण्याचे फळ म्हणजे परमशांतीची प्राप्ती होय असेच सांगितले आहे.

**भोक्तारं यज्ञतपसां सर्वलोकमहेश्वरम ।**
**सुहृदं सर्वभूतानां ज्ञात्वा मां शान्तिमृच्छति ।।**

(गीता ५ । २९)

'माझा भक्त मला सर्व यज्ञांचा आणि तपांचा भोक्ता, संपूर्ण

लोकांच्या ईश्वरांचाही ईश्वर तसेच संपूर्ण प्राणिमात्रांचा सखा अर्थात् निःस्वार्थ, दयाळू आणि प्रेमळ या तत्त्वांनी जाणून परमशांतीला प्राप्त होतो.'

येथे असा प्रश्न उपस्थित होतो की अशाप्रकारे जो भगवंतांना यज्ञतपांचा भोक्ता, समस्त लोकांचा महेश्वर तसेच सर्व प्राणिमात्रांचा सुहृद अशा तिन्ही लक्षणांनी युक्त असे जाणतो, तोच परमशांतीला प्राप्त होतो की, यांपैकी कोणत्याही एकालाच जाणणाऱ्याला परमशांतीची प्राप्ती होते? ह्याचे उत्तर असे आहे की, भगवंतांना वरील लक्षणांपैकी कोणत्याही एका लक्षणाने युक्त असे जाणणाऱ्याला सुद्धा शांती मिळते, मग तिन्ही लक्षणांनी युक्त असे जाणणाऱ्याला शांती मिळेल याबद्दल काय सांगावे?

भगवंतांना यज्ञ आणि तपांचा भोक्ता असे येथे म्हणण्याचा हेतू हाच आहे की, यज्ञ, दान, तप इत्यादी जेवढी म्हणून शास्त्रात सांगितलेली कर्मे आहेत त्या सर्वांचे पर्यवसान परमात्म्यातच होते. आकाशातून पडलेले पाणी जसे समुद्रात प्रवेश करते तसेच सगळी कर्मे परमेश्वराच्या ठिकाणी सामावून जातात. अशाप्रकारे जाणून नवव्या अध्यायातील २७, २८ व्या श्लोकात वर्णन केल्याप्रमाणे भगवंतांना सर्व अर्पण करण्याच्या बुद्धीने कर्म करणारा मनुष्य परमशांतिस्वरूप परमात्म्याला प्राप्त होतो. या मागील भावना अशी आहे की, पशू, पक्षी, कीटक, पतंग, मानव, देवता इत्यादी सर्व प्राण्यांमध्ये भगवंत विराजमान आहेत. म्हणून त्यांची सेवा पूजा म्हणजे भगवंतांचीच सेवा-पूजा होय. (गीता १८ । ४६) असे समजून भगवद्भावाने सर्वांची सेवा केली पाहिजे. जो अशाप्रकारे सर्वांची सेवा करतो, तो ती सेवा करत असताना म्हणजेच अतिथीस भोजन, गाईला चारा, कावळ्याला अन्नाचा घास आणि वृक्षांना पाणी घालत असताना असाच विचार करतो की, भगवंत अतिथीच्या रूपाने भोजन करीत आहेत, तेच गाईच्या रूपाने चारा खात आहेत. तेच कावळ्याच्या रूपाने अन्न ग्रहण करत आहेत

आणि तेच वृक्षांच्या रूपाने पाणी पीत आहेत. अशा प्रकारच्या भावनेने युक्त होऊन सर्वांची निष्काम सेवा करणे म्हणजेच तत्त्वाने भगवंतांना यज्ञतपांचा भोक्ता म्हणून जाणणे होय आणि असे जाणणारा माणूस परमशांतीला प्राप्त होतो.

सर्व लोक महेश्वर म्हणून भगवंतांना जाणण्याचा हेतू हा आहे की, भगवंत संपूर्ण लोकांच्या ईश्वरांचे देखील महान ईश्वर आहेत. तेच संपूर्ण विश्वाची उत्पत्ती स्थिती आणि लय करत असताना सर्वांवर नियंत्रण ठेवतात, म्हणून त्यांना परमात्मा, पुरुषोत्तम इत्यादी नावांनी संबोधले आहे. (गीता १५ । १७-१८). जो त्या परमात्म्याला क्षर-अक्षर स्वरूप तसेच संपूर्ण प्राण्यांहून आणि पदार्थांहून श्रेष्ठ, सर्वशक्तिमान, सर्वांचा अंतर्यामी, सर्वांचे नियंत्रण करणारा, सर्वाध्यक्ष आणि सर्वेश्वर स्वरूप असे जाणतो. तो मग त्या परमात्म्याला सोडून पुन्हा इतर कोणाची कशी बरे भक्ती करू शकेल? पत्नी, पुत्र, संपत्ती इत्यादी ऐहिक पदार्थांवर तो प्रेमही करत नाही आणि त्यांचे चिंतनही करत नाही. तो तर सर्व प्रकारे श्रद्धा, भक्ती आणि निष्काम भावाने सदैव अखण्डपणे भगवंतांचेच भजन व ध्यान करतो (गीता १५ । १९) म्हणून उपरनिर्दिष्ट प्रकाराने जाणून घेणे म्हणजेच भगवंतांना तत्त्वरूपाने सर्व लोक महेश्वर असे जाणणे होय आणि अशाप्रकारे जाणणारा मनुष्य परमशांतीला प्राप्त होतो.

भगवंत सर्व प्राणिमात्रांचे सुहृद आहेत असे जाणण्यामागील भाग हाच आहे की भगवंतांच्या प्रत्येक कृतीत विश्वाचे कल्याण आणि प्रेम भरलेले असते. त्यांचे कोणतेही विधान दयारहित किंवा प्रेमरहित नसते. म्हणून भगवंत सर्व प्राणिमात्रांचे सुहृद आहेत. जो मनुष्य हे रहस्य जाणतो तो मग प्रत्येक अवस्थेत जे काही घडते ते अत्यंत दयाळू, अत्यंत प्रेमळ अशा परमेश्वराच्या दयेचे आणि प्रेमाने ओतप्रोत मंगल असे विधान आहे असे जाणून नेहमीच प्रसन्नचित्त असतो आणि भगवंतांचा अनुयायी व अत्यंत प्रेम करणारा असा होतो. त्याच्या ठिकाणी देखील

मैत्रभाव उत्पन्न होतो व तो देखील सर्वांवर निर्हेतुक दया करणारा आणि सर्वांवर प्रेम करणारा असा होतो. त्याच्यातील द्वेषभाव नाहीसा होऊन क्षमा आणि समता इत्यादी गुण स्वाभाविकपणेच येतात तसेच त्याच्या बुद्धीचा आणि चित्ताचा भगवंतांमध्ये प्रवेश होतो. अशाप्रकारे त्याच्या ठिकाणी गीतेतील बाराव्या अध्यायातील १३ ते १९ पर्यंतच्या श्लोकांत वर्णन केलेल्या भक्ताची सर्व लक्षणे येतात. म्हणून तो परमशांतीला प्राप्त करून घेतो.

सहाव्या अध्यायातील ११ ते १३ व्या श्लोकापर्यंत आसन विधी सांगून १४ व्या श्लोकात भगवंतांनी आपल्या सगुण स्वरूपाचे ध्यान[१] करत असताना शरण जाण्यास सांगितले आहेत. ते म्हणतात -

**प्रशान्तात्मा विगतभीर्ब्रह्मचारिव्रते स्थितः ।**
**मनः संयम्य मच्चित्तो युक्त आसीत मत्परः ।।**

ब्रह्मचारी व्रताचे आचरण करणाऱ्या, निर्भय तसेच उत्तम प्रकारे प्रशांत मन असलेल्या सावधान योग्याने, मनावर - नियंत्रण ठेवून माझ्या ठिकाणी चित्त असताना मत्परायण असे असावे.'

तसेच ह्याच अध्यायातील ३० व्या श्लोकात भगवंतांना सर्वत्र पाहाण्याचे असे महत्त्व सांगितले आहे की, भगवंतांना सर्वत्र पाहाणारा माझ्या दृष्टीच्या पलिकडे जात नाही आणि मी देखील त्याच्या दृष्टीच्या पलिकडे जात नाही.

अशाप्रकारे या अध्यायाच्या ३१ व्या आणि ४७ व्या श्लोकांमध्ये देखील भक्तिभाव सर्वार्थाने ओतप्रोत भरलेला आहे. म्हणून हे जाणले पाहिजे की, कर्मयोगप्रधान म्हटल्या जाणाऱ्या अध्यायांमध्ये सुद्धा कोणताही अध्याय भक्तिशिवाय नाही.

---

१-सगुण-साकार ध्यानाविषयी सविस्तरपणे जाणून घ्यावयाचे असेल तर गीताप्रेसद्वारा प्रकाशित 'गीता-तत्त्वविवेचनी' मधील या श्लोकावरील टीका पाहू शकता.

अशाप्रकारे ज्या (१३ ते १८ पर्यंत) सहा अध्यायांमध्ये ज्ञानयोगाचे प्राधान्य दर्शविले आहे त्यांत देखील कोणताही अध्याय भक्तियोगाच्या वर्णनाशिवाय असलेला असा नाही. उदाहरणार्थ तेराव्या अध्यायात ज्ञानाची साधने सांगताना म्हटले आहे की,

**मयि चानन्ययोगेन भक्तिरव्यभिचारिणी ।**

(गीता १३ । १० चा पूर्वार्ध)

'मज परमात्म्याच्या ठिकाणी अनन्य योगाद्वारा केलेली अव्यभिचारिणी भक्ती (देखील ज्ञानाचे साधन आहे.)'

चौदाव्या अध्यायात गुणातीत होण्याचे साधन सांगत असताना स्वतः भगवंत म्हणतात -

**मां च योऽव्यभिचारेण भक्तियोगेन सेवते ।**
**स गुणान् समतीत्यैतान् ब्रह्मभूयाय कल्पते ।।**

(गीता १४ । २६)

'जो पुरुष अव्यभिचारी म्हणजे अनन्य भक्तियोगाने मला अखंडपणे भजतो, तो सुद्धा ह्या तीन गुणांना उत्तमप्रकारे पार करून सच्चिदानंदघन ब्रह्म प्राप्त करण्यास पात्र ठरतो.'

येथे अनन्य भक्तीला गुणांच्या पलिकडे जाण्याचे साधन म्हणून सांगितले आहे.

पंधराव्या अध्यायात परमपद प्राप्तीचे साधन म्हणजे प्रखर अशा वैराग्याद्वारे संसाररूपी वृक्षाला छेदून भगवंतांना शरण जाणे असे सांगितले आहे. भगवंत म्हणतात -

**ततः पदं तत्परिमार्गितव्यं यस्मिन्गता न निवर्तन्ति भूयः ।**
**तमेव चाद्यं पुरुषं प्रपद्ये यतः प्रवृत्तिः प्रसृता पुराणी ।।**

(गीता १५ । ४)

'दृढ वैराग्यरूपी शस्त्राने संसाररूपी वृक्षाला छेदून टाकल्यानंतर त्या परमपदरूप परमेश्वराला उत्तम प्रकारे शोधले पाहिजे की जेथे गेलेले पुरुष पुन्हा या जगात परत येत नाहीत आणि 'ज्या परमेश्वरापासून या

प्राचीन संसाररूपी वृक्षाचा विस्तार झालेला आहे त्या आदिपुरुष नारायणाला मी शरण आहे' अशा प्रकारचा दृढ निश्चय करून त्या परमेश्वराचे मनन आणि चिंतन केले पाहिजे.'

तसेच १६ व्या श्लोकात क्षर आणि अक्षराचे वर्णन करून ज्याचे परमात्मा, ईश्वर आणि पुरुषोत्तम इत्यादी नामांनी वर्णन केले आहे त्या परमतत्त्वाला वास्तविकरूपात जाणणाऱ्याची परीक्षा 'सर्व प्रकारे भक्ती' हीच सांगितलेली आहे -

**यो मामेवमसम्मूढो जानाति पुरुषोत्तमम् ।**
**स सर्वविद् भजति मां सर्वभावेन भारत ।।**

(गीता १५ । १९)

'हे भारत, जो ज्ञानी पुरुष मला अशाप्रकारे तत्त्वानेच पुरुषोत्तम म्हणून जाणतो, तो सर्वज्ञ पुरुष सर्व प्रकारे सदैव वासुदेव परमेश्वर अशा माझीच भक्ती करतो.'

सोळाव्या अध्यायाच्या पहिल्या श्लोकात दैवी संपत्तीचे लक्षण सांगताना असे म्हटले आहे -

**अभयं सत्त्वसंशुद्धिर्ज्ञानयोगव्यवस्थितिः ।**

'निर्भयता, अंतःकरणाची पूर्ण शुद्धी आणि ज्ञानयोगातील अढळ स्थिती (-ही दैवी संपत्तीची प्रमुख लक्षणे आहेत.)

येथे **'ज्ञानयोगव्यवस्थितिः'** चा अर्थ तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने परमात्म्याच्या ध्यानयोगातील अखंड दृढ स्थिती असा केला जातो तो भक्तिभावाचेच द्योतक आहे.

सतराव्या अध्यायातील २३ ते २७ व्या श्लोकापर्यंत परमात्म्याची ॐ, तत्, सत् ही तीन नावे सांगून त्यांचा कशा प्रकारे उपयोग केल्यामुळे कल्याण होते त्याचे स्पष्टपणे वर्णन केलेले आहे.

अठराव्या अध्यायाबद्दल तर काय वर्णावे? भगवंतांनी त्याचा उपसंहार शरणागतीतच केला आहे. तेथील कर्मयोगाच्या प्रकरणात सुद्धा भक्तीचेच वर्णन आहे. भगवंत म्हणतात -

**यतः प्रवृत्तिर्भूतानां येन सर्वमिदं ततम् ।**
**स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विन्दति मानवः ।।**

(गीता १८ । ४६)

'ज्या परमेश्वरापासून संपूर्ण प्राणिमात्रांची उत्पत्ती झाली आहे आणि ज्याने हे संपूर्ण जग व्यापलेले आहे त्या परमेश्वराची आपल्या स्वाभाविक कर्मांनी पूजा करून मनुष्य परम सिद्धिला प्राप्त होतो.'

तसेच ज्ञानयोगाच्या प्रकरणात देखील भक्तीची (उपासनेची) आवश्यकता सांगितली आहे.

**ध्यानयोगपरो नित्यं वैराग्यं समुपाश्रितः ।।**

(गीता १८ । ५२ उत्तरार्ध)

'अढळ वैराग्याचा आश्रय घेऊन सदैव अविरतपणे परमात्म्याच्या ध्यानरूपयोगात परायण पुरुष (ब्रह्मप्राप्तीला योग्य होतो.)'

एकान्तवास आणि ध्यानयोगपूर्वक ज्ञाननिष्ठेच्या द्वारा ज्या परमपदाची प्राप्ती होते, त्याच परमपदाची प्राप्ती गोपिकांप्रमाणे * नेहमी भगवंतांना शरण जाऊन आपले कर्तव्य कर्म करत असताना सुद्धा होते.

---

*भक्तियुक्त गोपिका कशा प्रकारे भक्ती करत असताना सर्व कामे करत असत, याचे वर्णन श्रीमद्भागवताच्या दशम स्कंधाच्या ४४ व्या अध्यायातील १५ व्या श्लोकात अशाप्रकारे आढळते -

या दोहनेऽवहनने मथनोपलेप-
प्रेङ्खेङ्खनार्भरुदितोक्षणमार्जनादौ ।
गायन्ति चैनमनुरक्तधियोऽश्रुकण्ठ्यो
धन्या व्रजस्त्रिय उरुक्रमचित्तयानाः ।।

'ज्या गोपिका गाईंचे दोहन करताना, धान्य इत्यादी कांडताना, दही मंथन करताना, अंगण सारवताना, आपल्या बाळांना पाळण्याचा झोका देताना, रडणाऱ्या बालकांना अंगाईगीत गाताना, घरात पाणी शिंपडताना आणि केरवारे करणे इत्यादी कामे करताना प्रेमपूर्ण मनाने डोळ्यात अश्रु दाटलेल्या सगद्गद स्वरांनी श्रीकृष्णाचे नाम आणि गुणांचे गायन करत असतात, अशाप्रकारे सदैव श्रीकृष्णाच्याच स्वरूपात चित्तलय असणाऱ्या त्या व्रजवासिनी गोपिका धन्य आहेत.'

भगवंत म्हणतात -

**सर्वकर्माण्यपि सदा कुर्वाणो मद्व्यपाश्रयः ।**
**मत्प्रसादादवाप्नोति शाश्वतं पदमव्ययम् ।।**

(गीता १८ । ५६)

'मत्परायण असणारा कर्मयोगी तर संपूर्ण कर्मांचे आचरण करत असताना सुद्धा माझ्या कृपेने सनातन अविनाशी अशा परमपदाला प्राप्त होतो.

अशाप्रकारे भगवंतांनी आपल्या शरणागतिरूप भक्तीचे माहात्म्य सांगून अर्जुनाला सर्व प्रकारांनी आपल्या शरण येण्याचा आदेश दिला आहे -

**चेतसा सर्वकर्माणि मयि संन्यस्य मत्परः ।**
**बुद्धियोगमुपाश्रित्य मच्चित्तः सततं भव ।।**
**मच्चित्तः सर्वदुर्गाणि मत्प्रसादात् तरिष्यसि ।**

(गीता १८ । ५७, ५८ चा पूर्वार्ध)

'सर्व कर्मांना मनाने माझ्या ठिकाणी अर्पण करून तसेच समबुद्धिरूप योगाचे अवलंबन करून मत्परायण हो आणि माझ्या ठिकाणी अविरतपणे चित्ताला लाव. अशाप्रकारे माझ्या ठिकाणी चित्त लावून माझ्या कृपेने तू सर्व संकटांना सहजपणे पार करशील.'

येथे भगवंतांनी आपल्या सगुण साकार स्वरूपाच्या भक्तीच्या लक्षणांचे वर्णन करून अर्जुनाला आपल्याला शरण येण्याची आज्ञा देऊन त्याचे महत्त्व दर्शविले आहे. सगुण-निराकाराला शरण जाण्याचे फळ जरी परमशांती आणि परमपदाची प्राप्ती असे असले तरी त्याला गुह्यतरच म्हटले आहे. गुह्यतम नाही. भगवंत म्हणतात -

**तमेव शरणं गच्छ सर्वभावेन भारत ।**
**तत्प्रसादात्परां शान्तिं स्थानं प्राप्स्यसि शाश्वतम् ।।**
**इति ते ज्ञानमाख्यातं गुह्याद्गुह्यतरं मया ।**

(गीता १८ । ६२, ६३ चा पूर्वार्ध)

'हे भारत ! तू सर्व प्रकारांनी त्या सर्वव्यापी परमेश्वराला शरण जा. त्या परमात्म्याच्या कृपेने तू परमशांतीला तसेच सनातन परमधामाला प्राप्त होशील. अशाप्रकारे हे गुह्याहूनही गुह्य असे ज्ञान मी तुला सांगितले आहे.'

भगवंतांनी गुह्यतम तर आपल्या शरणगतिरूप भक्तीलाच म्हटले आहे -

**सर्वगुह्यतमं भूयः शृणु मे परमं वचः ।**
**इष्टोऽसि मे दृढमिति ततो वक्ष्यामि ते हितम् ।।**
**मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ।**
**मामेवैष्यसि सत्यं ते प्रतिजाने प्रियोऽसि मे ।।**
**सर्वधर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज ।**
**अहं त्वा सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः ।।**

(गीता १८ । ६४-६६)

'सर्व गुह्यतमाहून अत्यंत गुह्य अशा माझ्या परमरहस्ययुक्त वचनांचे तू पुन्हा श्रवण कर. तू मला अतिशय प्रिय आहेस; म्हणून हे अत्यंत हितकारक असे वचन मी तुला सांगेन. तू माझ्या ठिकाणी चित्त स्थिर कर. माझा भक्त हो, माझे पूजन कर, आणि मला नमस्कार कर. असे केल्यामुळे तू मलाच प्राप्त होशील, ही मी तुझ्याजवळ सत्य प्रतिज्ञा करत आहे; कारण की, तू मला अत्यंत प्रिय आहेस. सर्व धर्मांना म्हणजे सर्व कर्तव्यकर्मांना तू माझ्या ठिकाणी त्यज म्हणजे मला अर्पण करून तू केवळ फक्त मज सर्वशक्तिमान, सर्वाधार अशा परमेश्वरालाच शरण जा. मी तुला सर्व पापांपासून मुक्त करेन. तू दुःख करू नकोस.'

यामधून सर्व गुह्यतम असे सांगण्याचा हा हेतू आहे की, ६२ व्या आणि ६३ व्या श्लोकात तर सर्वव्यापी निराकार परमात्म्याला शरण जाण्यासच गुह्यतर म्हटले आहे, परंतु येथे स्वतः भगवंत प्रगट होऊन आपली ओळख देताना म्हणतात, मी साक्षात परमात्मा आहे. तू मला शरण ये.' अशाप्रकारे प्रगट होऊन आपली ओळख देणे

अर्जुनासारख्या आपल्या अत्यंत प्रेमळ भक्ताच्याच बाबतीत शक्य आहे. दुसऱ्या कोणाकडूनही हे सांगितले गेले नसते, 'मी साक्षात परमात्मा आहे, तू मला शरण ये.'

येथे ६४ व्या श्लोकात, 'तू माझे सर्वांत रहस्यमय श्रेष्ठ असे वचन पुन्हा ऐक' असे सांगून भगवंतांनी प्रथम नवव्या अध्यायातील ३४ व्या श्लोकात सांगितलेल्या वचनाकडे निर्देश केला आहे. तेथे ३२ व्या श्लोकात तर शरणागतीचे माहात्म्य आहे आणि ३४ व्या श्लोकात तिचे स्वरूप सांगितले आहे. त्याला देखील गुह्यतम असेच म्हटले आहे. नवव्या अध्यायाच्या पहिल्या आणि दुसऱ्या श्लोकांत **'अनसूयवे'** या पदाने अर्जुनाला त्याचा श्रेष्ठ असा अधिकारी मानले आहे आणि गुह्यतम रहस्याची खूप प्रशंसा करून गुह्यतम, राजगुह्य इत्यादी शब्दांचा उपयोग करताना ज्या शरणागतिरूप भक्तीबद्दल सांगण्याची प्रतिज्ञा केली होती, तिचे त्या अध्यायात सविस्तर वर्णन केले आहे आणि शेवटी ३४ व्या श्लोकात शरणागतीचा स्पष्ट निर्देश करतानाच अध्यायाची समाप्ती केली आहे. भगवंत म्हणतात -

**मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ।**
**मामेवैष्यसि युक्त्वैवमात्मानं मत्परायणः ।।**

'माझ्या ठिकाणी मनाला एकाग्र कर, माझा भक्त हो, माझे पूजन कर आणि मला नमस्कार कर. अशाप्रकारे आत्म्याला माझ्या ठिकाणी नियुक्त करून माझ्या ठिकाणी परायण असलेला तू मलाच प्राप्त होशील.'

येथे असा प्रश्न उपस्थित होतो की येथे सांगितलेल्या शरणागतिरूप चार साधनांपैकी एका साधनाने भगवत्प्राप्ती होते की चारही साधनांनी? याचे उत्तर असे आहे की एकाच्याच अनुष्ठानाने भगवत्प्राप्ती होते; मग चारही अनुष्ठानांनी होईल यात सांगायचे ते काय?

केवळ **'मन्मना भव'** - भगवंतांच्या ठिकाणी मन लावण्याच्या साधनाने ही भगवत्प्राप्ती होते याचे कथन याच अध्यायातील २२ व्या श्लोकावरून जाणले पाहिजे. भगवंत म्हणतात -

**अनन्याश्चिन्तयन्तो मां ये जनाः पर्युपासते ।**
**तेषां नित्याभियुक्तांना योगक्षेमं वहाम्यहम् ।।**

'अनन्य भावाने प्रेम करणारे जे भक्तजन अखंड चिंतन करत निष्काम भावाने मज परमेश्वराची भक्ती करतात, त्या सदासर्वदा माझे चिंतन करणाऱ्या लोकांच्या योगक्षेमाची मी स्वतःच प्राप्ती करून देतो.'

येथे योग म्हणजे अप्राप्त असलेल्याची प्राप्ती असा होतो आणि प्राप्त झालेल्याचे रक्षण करणे म्हणजे क्षेम होय. म्हणून भगवंतांच्या प्राप्तीसाठी जी साधने त्यांच्या जवळ आहेत, सर्व प्रकारच्या संकटातून त्यांना वाचवून त्यांचे रक्षण करणे आणि ज्या साधनाची त्रुटी आहे, त्याची पूर्तता करून स्वतः आपली प्राप्ती करवून देणे म्हणजेच त्या प्रेमळ भक्तांचा योगक्षेम वाहणे होय.

भक्तिमार्गाचे हे एक वैशिष्ट्य आहे की साधक भक्ताने केलेल्या साधनाचे रक्षण आणि त्या साधनातील न्यूनतेची पूर्ती करणे हे देखील भगवंत करतात. येथे रक्षण करणे याचा असा अर्थ आहे की जर एखादा भक्त भगवंतांकडे एखादी ऐहिक वस्तू मागत असेल तर ती मागितल्यामुळे जर त्याचे अहित होणार आहे असे जर भगवंतांनी जाणले तर ती वस्तू ते त्याला देत नाहीत. उदाहरणार्थ नारदांनी भगवंतांजवळ हरीचे रूप मागितले होते, परंतु त्यात त्यांचे अहित आहे असे जाणून हरी शब्दाचा अर्थ माकड असाही होतो म्हणून भगवंतांनी त्यांना माकडाचे रूप दिले आणि त्याचा परिणाम म्हणजे नारदांनी दिलेला शापही भगवंतांनी स्वीकारला, परंतु आपल्या भक्ताला कांचन आणि कामिनी ह्यांच्यापासून त्यांनी अशाप्रकारे वाचविले की, ज्याप्रमाणे एखादा हितचिंतक उत्तम वैद्य आपल्या रोग्याला कुपथ्यापासून वाचवितो.

केवळ **'मद्भक्तो भव'** - भगवंतांच्या भक्तीच्या साधनांनी भगवंतांची प्राप्ती ह्याच अध्यायातील ३० व ३१ व्या श्लोकात सांगितली आहे.

केवळ **'मद्याजी भव'** - भगवंतांच्या पूजेने भगवंतांच्या प्राप्तीविषयी ह्याच अध्यायातील २६ व्या श्लोकापासून लक्षात घेतली पाहिजे.

भगवंत म्हणतात -

**पत्रं पुष्पं फलं तोयं यो मे भक्त्या प्रयच्छति ।**
**तदहं भक्त्युपहृतमश्नामि प्रयतात्मनः ।।**

'जो कोणी भक्त माझ्यासाठी प्रेमाने पत्र, पुष्प, फल, जल इत्यादी अर्पण करतो, त्या शुद्धबुद्धी निष्काम प्रेमळ भक्ताने प्रेमपूर्वक अर्पण केलेले ते पत्र-पुष्प इत्यादी मी सगुणरूपात प्रगट होऊन मोठ्या प्रेमाने भक्षण करतो.'

येथे असे जाणून घेण्याची इच्छा निर्माण होते की, ह्या श्लोकात पत्र, पुष्प, फल, जल हे चार पदार्थ अर्पण करण्याचा निर्देश आहे; म्हणून हे चार पदार्थ अर्पण केल्याने भगवंत प्रगट होऊन त्याच्या भेटीचा स्वीकार करतात की, एकच पदार्थ अर्पण केल्याने सुद्धा ! ह्याचे उत्तर असे आहे की, प्रेमपूर्वक एकच पदार्थ अर्पण केल्याने सुद्धा भगवंत त्याचा स्वीकार करतात; कारण ह्यात कृती किंवा पदार्थांना महत्त्व नसून प्रेमाला महत्त्व आहे. प्रेम असल्यामुळे चारांपैकी एक वेळ एकच पदार्थ अर्पण केला तरी भगवंत त्याचा स्वीकार करतात. जसे द्रौपदीने * केवळ पान अर्पण केल्यामुळे, गजेंद्राने ✠ केवळ पुष्प अर्पण केल्यामुळे, भिल्लिणीने ℘ केवळ फळे अर्पण केल्यामुळे आणि राजा रन्तिदेवाने ⌘ केवळ जल अर्पण केल्यामुळे भगवंत प्रगट होऊन त्यांनी दिलेल्या पदार्थांचे ग्रहण केले. अशाप्रकारे हे सगळे एक एकच पदार्थ अर्पण करून भगवंतांना प्राप्त झाले. तेव्हा सर्व प्रकारांनी भक्तिपूर्वक भगवंतांची पूजा करणाऱ्यांना भगवत्प्राप्ती होते यात आणखी सांगायचे ते काय ?

---

* द्रौपदीची ही कथा महाभारतातील वनपर्वाच्या २६३ व्या अध्यायात पाहू शकता.

✠ गजेंद्राची कथा श्रीमद्भागवताच्या आठव्या स्कंधाच्या तिसऱ्या अध्यायात पाहू शकता.

℘ भिल्लिणीची कथा श्रीरामचरित मानसातील अरण्यकांडात पाहू शकता.

⌘ महाराज रन्तिदेवाची कथा श्रीमद्भागवताच्या नवव्या स्कंधातील २१ व्या अध्यायात पाहू शकता.

अशाप्रकारे केवळ **'नमस्कुरु'** नमस्कार केल्याने देखील भगवत्प्राप्ती होऊ शकते, परंतु गीतेत भगवंतांनी नमस्काराबरोबरच कीर्तन इत्यादी भक्तीच्या इतर अंगांचा देखील समावेश केला आहे -

**सततं कीर्तयन्तो मां यतन्तश्च दृढव्रताः ।**
**नमस्यन्तश्च मां भक्त्या नित्ययुक्ता उपासते ।।**

(गीता ९ । १४)

'ते दृढनिश्चय असलेले भक्तजन माझ्या नाम आणि गुणांचे कीर्तन करत असणारे तसेच माझ्या प्राप्तीसाठी प्रयत्न करणारे आणि मला वारंवार नमस्कार करणारे नेहमी माझ्या ध्यानाशी जोडून अनन्य प्रेमाने माझी उपासना करतात.'

महाभारतातील शांतीपर्वात तर केवळ नमस्कार केल्याने सुद्धा या जगातून उद्धार होतो असे सांगितले आहे -

**एकोऽपि कृष्णस्य कृतः प्रणामो दशाश्वमेधावभृथेन तुल्यः ।**
**दशाश्वमेधी पुनरेति जन्म कृष्णप्रणामी न पुनर्भवाय ।।**

(४७ । ९२)

'भगवान श्रीकृष्णांना केवळ एकदाच केलेला नमस्कार दश अश्वमेध यज्ञांच्या शेवटी केल्या जाणाऱ्या अवभृथ स्नानातुल्य असतो. एवढेच नव्हे तर दहा अश्वमेध यज्ञ करणारा तर फक्त त्याच्या फळाचा उपभोग घेऊन पुन्हा या विश्वात जन्म घेतो, परंतु भगवान श्रीकृष्णांना नमस्कार करणारा पुन्हा या जगात जन्म घेत नाही.'

वरती सांगितलेच आहे की, नवव्या अध्यायातील पहिल्या आणि दुसऱ्या श्लोकात भगवंतांनी भक्तीला सर्व गुह्यतम, राजगुह्य, आणि विज्ञानसहित ज्ञान असे म्हणून त्याची अगदी खूपच प्रशंसा केली आहे आणि त्याला अत्यंत उत्तम व सुगम असे म्हटले आहे. असे सुगम साधन असल्यानंतर सुद्धा सगळीच माणसे त्यात मग्न होत नाहीत याचे कारण त्यात श्रद्धा नसते हेच होय. भगवंत म्हणतात -

**अश्रद्दधानाः पुरुषा धर्मस्यास्य परंतप ।**

**अप्राप्य मां निवर्तन्ते मृत्युसंसारवर्त्मनि ।।**

(गीता ९ । ३)

'हे परंतप ! उपरनिर्दिष्ट धर्माच्या ठिकाणी श्रद्धा नसणारे पुरुष मला प्राप्त न होता मृत्युरुपी संसार-चक्रात फिरत राहातात.'

येथे असा प्रश्न उपस्थित होतो की, ज्याच्या भक्तीच्या साधनात श्रद्धा नाही त्याचे जगातील म्हणजे चौऱ्यांशी लक्ष योनीत फिरणे तर संपूर्णपणे योग्य आहे, परंतु येथे 'मला प्राप्त न होता' असे म्हणण्याची काय गरज आहे. कारण त्याला भगवत्प्राप्तीची शक्यताच नाही. याचे उत्तर असे आहे की, 'मला प्राप्त न होता' सांगण्याने असे सिद्ध होते की प्रत्येक मनुष्याला भगवत्प्राप्तीचा जन्मसिद्ध हक्क आहे. जसे राजपुत्राला ज्या राज्यावर बसण्याचा जन्मसिद्ध अधिकार असताना सुद्धा पित्याच्या ठिकाणी श्रद्धा आणि भक्ती नसल्यामुळे तो त्या राज्याला वंचित झाला तर त्यात दोषास्पद असे काहीच नसते, त्याच प्रमाणे भगवत्प्राप्तीचा मनुष्याला जन्मसिद्ध अधिकार असूनही भगवंतांच्या ठिकाणी श्रद्धा, भक्ती, प्रेम नसल्यामुळे कोणी जर भगवत्प्राप्तीला वंचित झाला तर ते अयोग्य ठरत नाही.

म्हणून माणसाने श्रद्धा-भक्तिपूर्वक नेहमी अविरत भगवंतांचे स्मरण केले पाहिजे; कारण उठता-बैसता, झोपेत-जागेपणी, प्रत्येक वेळी भगवंतांचे स्मरण करणे सर्वात उत्तम होय. प्रत्येक वेळी भगवंतांचे स्मरण केल्याने अंतकाळी भगवंतांचे स्मरण सहजच होते आणि अंतकाळच्या स्मरणाचे फार मोठे महत्त्व आहे. भगवंत म्हणतात -

**अन्तकाले च मामेव स्मरन्मुक्त्वा कलेवरम् ।**
**यः प्रयाति स मद्भावं याति नास्त्यत्र संशयः ।।**

(गीता ८ । ५)

'जो पुरुष अंतकाळी माझेच स्मरण करताना शरीराचा त्याग करून येथून निघून जातो, तो माझ्या साक्षात् स्वरूपाला प्राप्त होतो - यात काहीही शंका नाही.'

जर असे म्हटले की भगवंतांचे स्मरण करता करता मरणाऱ्याचा तर भगवंत उद्धार करतात आणि जो त्यांचे स्मरण करत नाही, त्याचा उद्धार करत नाहीत तर भगवंत काय आपला मानमरातब करणाऱ्याचीच बाजू घेतात, तर हे म्हणणे योग्य नाही; कारण की भगवंतांनी असा नियम सांगितला आहे की, मृत्यूच्या वेळी जो मनुष्य पशू, पक्षी, कीटक, पतंग, मनुष्य, देवता, पितर इत्यादी कोणत्याही स्वरूपाचे चिंतन करताना मृत्यू पावला तर तो त्याच स्वरूपाला प्राप्त होतो. (गीता ८ । ६). या न्यायाने भगवंतांचे स्मरण करताना मरणारा भगवंतांनाच प्राप्त होतो. म्हणून वरील कथनानुसार भगवंतांच्या ठिकाणी पक्षपात किंवा विषमता या विषयी कोणताही दोष राहात नाही. भगवंतांनी स्वत:सुद्धा म्हटले आहे -

**समोऽहं सर्वभूतेषु न मे द्वेष्योऽस्ति न प्रियः ।**
**ये भजन्ति तु मां भक्त्या मयि ते तेषु चाप्यहम् ।।**

(गीता ९ । २९)

'मी सर्व प्राणिमात्रांच्या ठिकाणी समभावाने व्याप्त आहे. मला कोणी अप्रियही नाही किंवा प्रियही नाही, परंतु जे भक्त प्रेमाने माझी भक्ती करतात, ते माझ्यातच असतात आणि मी सुद्धा त्यांच्या ठिकाणी प्रत्यक्ष प्रगट असतो.'

श्रीतुलसीदासकृत रामचरितमानसातील किष्किंधाकांडात भगवान श्रीरामचंद्रांनी सुद्धा भक्त हनुमंतांना म्हटले आहे -

**समदरसी मोहि कह सब कोऊ । सेवक प्रिय अनन्यगति सोऊ ।।**

(३ । ४)

येथे असे जाणून घ्यावेसे वाटते की 'भगवंत समदर्शी असून सुद्धा जेव्हा आपले भजन करणाऱ्यांसाठी असे म्हणतात की, तो माझ्या हृदयात आहे आणि मी त्याच्या हृदयात आहे, तेव्हा येथे विषमता नाही काय?' ह्याचे उत्तर असे आहे की सूर्य सर्वांवर समभावाने प्रकाश पाडतो, परंतु आरशात त्याचे प्रतिबिंब दिसते, लाकूड इत्यादींच्या

ठिकाणी नव्हे. भिंग तर सूर्यकिरणांना आकर्षून घेऊन कापूस किंवा कापड इत्यादींना जाळून भस्म करते. हे त्या पदार्थाचे वैशिष्ट्य आहे. येथे सूर्याच्या ठिकाणी विषमभाव नाही. त्याचप्रमाणे भगवंतांच्या भक्तांच्या प्रेमाचे उपर्युक्त वैशिष्टय आहे. त्यात भगवंताच्या ठिकाणी विषमता आहे असा कोणताही दोष येत नाही.

म्हणून नेहमी भगवंतांचे नाम आणि रूपाचे स्मरण केले पाहिजे; कारण की शरीराचा काहीच भरवसा नाही; कळत नाही की केव्हा शरीरातून प्राण बाहेर पडतील. सतत नामस्मरण करणाऱ्या भक्ताला अंतकाळी भगवंतांचे स्मरण होणे स्वाभाविकच असते. जो मनुष्य अखंडपणे परमदिव्य पुरुष परमात्म्याचे चिंतन करत असतो तो भगवंतांच्या भक्तीच्या प्रभावाने अंतकाळी भगवंतांचे स्मरण करत असताना त्या परमदिव्य पुरुषोत्तमाची प्राप्ती करून घेतो. तसेच जो इंद्रिये आणि मनाला सर्व दृष्टीने ताब्यात ठेवून श्रद्धा-भक्तिपूर्वक परमेश्वराच्या नामाचा उच्चार आणि त्याचे ध्यान करत शरीर सोडून जातो तो निश्चितपणे परमगतीला प्राप्त होतो. (गीता ८ । ८-१३) ।*

म्हणून ज्ञानयोग, ध्यानयोग, अष्टाङ्गयोग, कर्मयोग इत्यादी जेवढी म्हणून भगवत्प्राप्तीची साधने आहेत, त्या सर्वांत भगद्भक्ती ही उत्तम आहे. भगवंतांनी सहाव्या अध्यायाच्या ४७ व्या श्लोकात सांगितले आहे -

**योगिनामपि सर्वेषां मद्गतेनान्तरात्मना ।**
**श्रद्धावान् भजते यो मां स मे युक्तमो मतः ।।**

'सर्व योग्यांमध्ये जे कोणी श्रद्धावान योगी माझ्या ठिकाणी असलेल्या अंतरात्मा अशा मला अखंडपणे भजतो, तो योगी मला सर्वश्रेष्ठ मान्य आहे.'

---

* या विषयी सविस्तर संदर्भ पहावयाचा असेल तर गीता-तत्त्वविवेचनी टीकेतील आठव्या अध्यायातील ८ ते १३ श्लोकांवरील टीका वाचावी.

अशाप्रकारे अर्जुनाने विचारल्यानंतर बाराव्या अध्यायातील दुसऱ्या श्लोकात भगवंतांनी आपल्या भक्तांना सर्वोत्तम दर्शवून भक्तीचे महत्त्व दाखविले आहे -

**मय्यावेश्य मनो ये मां नित्ययुक्ता उपासते ।**
**श्रद्धया परयोपेतास्ते मे युक्ततमा मताः ।।**

'माझ्या ठिकाणी मनाला एकाग्र करून सदैव माझ्या भजन ध्यानात रमणारे जे भक्त अत्यंत परमश्रद्धेने युक्त होऊन सगुणरूप परमेश्वर अशा माझी भक्ती करतात, त्यांना योग्यांमध्ये श्रेष्ठ योगी असे मानले आहे.'

भक्ती जाणण्यास सोपी असल्यामुळे उत्तम आहे. एवढेच नव्हे तर भक्तिमार्गाचे हे वैशिष्टय आहे की भक्त आपल्या डोळ्यांनी भगवंतांना पाहू शकतो (गीता ११ । ५४) तसेच भक्तांनी प्रेमपूर्वक अर्पण केलेल्या पत्र-पुष्प-फल इत्यादींचा स्वीकार भगवंत प्रत्यक्ष प्रगट होऊन ग्रहण करतात (गीता ९ । २६). ही गोष्ट ज्ञानयोग, अष्टांगयोग किंवा कर्मयोगांद्वारे शक्य नाही. म्हणून भक्तीला सर्वोत्तम म्हणणे शास्त्रसंगत आणि सयुक्तिक आहे.

या शिवाय, अनन्य चित्ताने सदा सर्वदा स्मरण करणाऱ्याला भगवंत सहजपणे भेटतात -

**अनन्यचेताः सततं यो मां स्मरति नित्यशः ।**
**तस्याहं सुलभः पार्थ नित्ययुक्तस्य योगिनः ।।**

(गीता ८ । १४)

'हे अर्जुना ! जो मनुष्य माझ्यात अनन्यचित्त होऊन सदैव मज पुरुषोत्तमाचे स्मरण करतो, सदैव माझ्या ठिकाणी युक्त असलेल्या त्या योग्याला मी सुलभ आहे म्हणजेच मी त्याला सहज प्राप्त होतो.'

अनन्यभावाने चिंतन करणाऱ्या भक्ताला भगवंत सहज प्राप्त होतात. एवढेच नव्हे तर, भवसागरातून भगवंत त्याचा लगेच उद्धार करतात -

**ये तु सर्वाणि कर्माणि मयि संन्यस्य मत्पराः ।**
**अनन्येनैव योगेन मां ध्यायन्त उपासते ।।**
**तेषामहं समुद्धर्ता मृत्युसंसारसागरात् ।**
**भवामि नचिरात् पार्थ मय्यावेशितचेतसाम् ।।**

(गीता १२ । ६-७)

'मत्परायण असलेले भक्तजन संपूर्ण कर्मे मलाच अर्पण करून सगुणरूप अशा मज परमेश्वराचे अनन्य भक्तियोगाने अखंड चिंतन करणारे मला भजतात, हे अर्जुना ! माझ्यात चित्तलय झालेल्या त्या प्रेमळ भक्तांचा मृत्युरूपी संसार सागरातून मी तात्काळ उद्धार करतो.'

म्हणून आपण सर्वांनी अनन्य भक्तियोगाद्वारे भगवंतांचे अखंड चिंतन करता करता त्यांची उपासना केली पाहिजे. या जगात एका परमेश्वराशिवाय माझा कोणीही श्रेष्ठ असा हितचिंतक नाही, तेच माझे सर्वस्व आहेत - असे जाणून जे भगवंतांवर अत्यंत श्रद्धायुक्त प्रेम केले जाते - की ज्या प्रेमात स्वार्थ आणि अभिमान यांचा किंचितही दोष नाही, जो सर्वार्थाने पूर्ण आणि अटळ आहे, ज्याचा थोडा अंश सुद्धा भगवंतांव्यतिरिक्त इतर वस्तूंमध्ये नाही आणि ज्याच्यामुळे क्षणभर सुद्धा भगवंतांचे विस्मरण असह्य होते - त्यासच अनन्य भक्ती असे म्हणतात. अशा अनन्य भक्तियोगाने सदैव भगवंतांचे चिंतन करत असताना त्यांचे गुण प्रभाव आणि चरित्रांचे श्रवण-कीर्तन करणे तसेच त्यांच्या अत्यंत पवित्र अशा नामाचे उच्चारण आणि जप करणे म्हणजेच अनन्य भक्तियोगाने भगवंतांचे चिंतन करत असताना त्यांची उपासना करणे होय. अशाप्रकारे भगवंत अनन्य भक्ताचा तात्काळ उद्धार करतात.

मनुष्य कितीही पापी असो, भक्तीच्या प्रभावाने त्याच्या संपूर्ण पातकांचा नाशच होतो असे नव्हे तर तो श्रेष्ठ असा धर्मात्मा होतो आणि मग त्याला परमशांतीचा लाभ होतो. गीतेच्या नवव्या अध्यायातील ३० व्या आणि ३१ व्या श्लोकांत भगवंत म्हणतात -

**अपि चेत् सुदुराचारो भजते मामनन्यभाक् ।**

**साधुरेव स मन्तव्यः सम्यग्व्यवसितो हि सः ।।**
**क्षिप्रं भवति धर्मात्मा शश्वच्छान्तिं निगच्छति ।**
**कौन्तेय प्रति जानीहि न मे भक्तः प्रणश्यति ।।**

'जरी एखादा अत्यंत दुराचारी सुद्धा अनन्यभावाने माझा भक्त होऊन मला भजत असेल तर तो सज्जन म्हणून मानण्याच्या योग्यतेचा आहे, कारण त्याचा निश्चय यथार्थ आहे म्हणजेच त्याने अगदी चांगल्याप्रकारे निश्चय केला आहे की, परमेश्वर आणि त्याचे भजन यासारखे दुसरे काहीही नाही. म्हणून तो लवकरच धर्मात्मा होतो आणि चिरकाल असणाऱ्या परमशांतीला प्राप्त होतो. हे अर्जुना ! तू निश्चितच हे सत्य जाण की माझा भक्त कधीही नाश पावत नाही.'

संसारसागरातून जीवाचा उद्धार होणे अत्यंत कठीण आहे, परंतु भगवंतांना शरण गेल्यामुळे हे अत्यंत कठीण कार्य देखील सुसाध्य होते.

**दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया ।**
**मामेव ये प्रपद्यन्ते मायामेतां तरन्ति ते ।।**

(गीता ७ । १४)

कारण की ही अलौकिक म्हणजेच अत्यंत अद्भुत त्रिगुणमयी अशी माझी माया तरून जाण्यास अत्यंत कठीण आहे; परंतु जे लोक केवळ अखंडपणे मला भजतात ते ह्या मायेला ओलांडून जातात म्हणजेच संसारसागर तरून जातात.'

भगवंतांच्या भक्तीच्या प्रभावामुळे भगवंतांचे यथार्थ ज्ञानही होते आणि ज्ञानाबरोबरच भगवंतही त्याला भेटतात. भगवंत स्वतःच आपल्या त्या अनन्य भक्ताला असे ज्ञान देतात की ज्यामुळे त्याला त्यांची प्राप्ती आपोआपच होऊनही जाते. भगवंत म्हणतात -

**अहं सर्वस्य प्रभवो मत्तः सर्वं प्रवर्तते ।**
**इति मत्वा भजन्ते मां बुधा भावसमन्विताः ।।**
**मच्चित्ता मद्गतप्राणा बोधयन्तः परस्परम् ।**
**कथयन्तश्च मां नित्यं तुष्यन्ति च रमन्ति च ।।**

**तेषां सततयुक्तानां भजतां प्रीतिपूर्वकम् ।**
**ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयान्ति ते ।।**

(गीता १० । ८-१०)

'मी वासुदेवच संपूर्ण जगाच्या उत्पत्तीचे कारण आहे आणि माझ्यामुळेच संपूर्ण जगाची हालचाल होते - अशाप्रकारे जाणून श्रद्धा व भक्तीने युक्त बुद्धिमान भक्तजन परमेश्वर अशा मला सदैव भजतात. सदैव माझ्याच ठिकाणी चित्तलय करणारे आणि माझ्याच ठिकाणी प्राणार्पण करणारे ते भक्तजन माझ्या भक्तीच्या चर्चेतून आपापसात माझे तत्त्व, रहस्य आणि प्रभाव जाणून घेत तसेच प्रभावयुक्त माझे कीर्तन करत असतानाच नेहमी संतुष्ट असतात आणि वासुदेव असलेल्या अशा माझ्या ठिकाणी रममाण होतात. सदैव माझ्याच ठिकाणी ध्यान इत्यादी लावलेल्या आणि प्रेमपूर्वक भक्ती करणाऱ्या त्या भक्तांना मी असा तत्त्वज्ञानरूपी योग देतो की, ज्यामुळे ते मलाच प्राप्त होतात.'

गोष्ट अशी आहे की, जो मनुष्य भगवंतांच्या स्वरूप आणि प्रभावाला तत्त्वत: जाणतो, तो सर्व पापांपासून मुक्त होऊन परमात्म्याला प्राप्त होतो (गीता १०.३.८). भगवंतांच्या स्वरूप आणि प्रभावाचे वर्णन गीतेच्या सातव्या अध्यायातील सातव्या ते बाराव्या श्लोकापर्यंत, नवव्या अध्यायाच्या सोळा ते एकोणिसाव्या श्लोकापर्यंत तसेच पंधराव्या अध्यायातील बाराव्या ते पंधराव्या श्लोकापर्यंत तसेच इतरत्रही अनेक ठिकाणी केले गेले आहे. त्या सर्वांचे सार भगवंतांनी दहाव्या अध्यायातील एक्केचाळीसाव्या व बेचाळीसाव्या श्लोकांत दर्शविले आहे. ते म्हणतात-

**यद्यद्विभूतिमत्सत्त्वं श्रीमदूर्जितमेव वा ।**
**तत्तदेवावगच्छ त्वं मम तेजोंऽशसम्भवम् ।।**

(गीता १० । ४१)

'जी जी विभूतियुक्त म्हणजेच ऐश्वर्ययुक्त, कांतियुक्त आणि शक्तियुक्त वस्तू आहे त्या त्या वस्तूला तू माझ्या तेजाच्या एका अंशाची अभिव्यक्ती (प्रकटीकरण) जाण.'

भाव असा आहे की दहाव्या अध्यायाच्या चवथ्या श्लोकापासून सहाव्यापर्यंत तसेच एकोणिसाव्या श्लोकापासून चाळिसाव्यापर्यंत तसेच इतरत्र ज्या काही विभूती दर्शविल्या आहेत आणि संपूर्ण विश्वातील जड-चेतन, स्थावर-जंगम सर्व पदार्थांमध्ये जी काही शक्ती, बुद्धी, तेज, गुण, प्रभाव इत्यादी प्रतीत होतात, ते सगळेच्या सगळे मिळून सुद्धा भगवंतांच्या प्रभावाच्या केवळ एक अंशाचे प्रकटरूप आहे.

**अथवा बहुनैतेन किं ज्ञातेन तवार्जुन ।**
**विष्टभ्याहमिदं कृत्स्नमेकांशेन स्थितो जगत् ।।**

(गीता १० । ४२)

'किंवा हे अर्जुना ! हे खूप जाणून घेण्याचा तुला काय उपयोग? मी ह्या संपूर्ण विश्वाला आपल्या योगमायेच्या फक्त एका अंशाला धारण करून स्थित आहे.'

समुद्राच्या पाण्यातील बुडबुडा केवळ समुद्राचा एक अंश आहे, त्याप्रमाणे संपूर्ण गुण आणि प्रभावासह संपूर्ण ब्रह्मांड परमात्म्याच्या एका अंशात आहे - असे जाणून जो कुणी दहाव्या अध्यायातील वरील आठव्या, नवव्या आणि दहाव्या श्लोकानुसार परमेश्वराची उपासना करतो, तो विनासायासच परमेश्वराला प्राप्त करून घेतो.

वरील विवेचनावरून ही गोष्ट सिद्ध झाली की, भगवंतांची भक्ती ही ज्ञानयोग, अष्टांगयोग, कर्मयोग इत्यादी सर्व साधानांपेक्षा उत्तम, सुगम आणि सुलभ आहे - एवढेच नव्हे तर, भक्तिमुळे त्वरितच सर्व पापांचा नाश होऊन भगवंतांच्या स्वरूपाचे ज्ञान होते आणि मनुष्य ह्या तरून जाण्यास कठीण अशा संसार सागरातून तरून जाऊन भगवंतांच्या दर्शनाची प्राप्ती करून घेतो आणि भगवंतांना तत्त्वतः जाणून त्यांच्यात प्रविष्ट होतो. भगवंतांनी म्हटले आहे -

**भक्त्या त्वनन्यया शक्य अहमेवंविधोऽर्जुन ।**
**ज्ञातुं द्रष्टुं च तत्त्वेन प्रवेष्टुं च परंतप ।।**

(गीता ११ । ५४)

'हे परंतप अर्जुना ! अनन्य भक्तीच्या द्वारेच तर अशाप्रकारे रूपधारी मी प्रत्यक्ष दर्शनास, तत्त्व जाणण्यास तसेच प्रविष्ट होण्यास म्हणजेच एकत्त्व भावाने प्राप्त होण्यासाठी देखील शक्य आहे.

तसे तर ज्ञानयोगाने सुद्धा पापांचा नाश होऊन परमात्म्याचे ज्ञान व परमशांतीची प्राप्ती होऊ शकते (गीता ४ । ३४ - ३६, ३९), परंतु त्यामुळे सगुण साकार भगवंतांचे साक्षात् दर्शन होत नाही. अनन्य भक्तिमुळे तर परमात्म्याचे ज्ञान आणि प्राप्ती म्हणजेच एकत्व भावाने परमेश्वराच्या ठिकाणी प्रवेश होण्याव्यतिरिक्त त्यांचे साक्षात दर्शन होणेही शक्य असते. म्हणून भगवंतांच्या अनन्य भक्तीचा मार्ग सर्वात उत्तम आहे.

येथे त्या अनन्य भक्तीचे स्वरूप जाणण्यासाठी अनन्य भक्ताची लक्षणे सांगतात -

**मत्कर्मकृन्मत्परमो मद्भक्तः सङ्गवर्जितः ।**
**निर्वैरः सर्वभूतेषु यः स मामेति पाण्डव ।।**

(गीता ११ । ५५)

'हे अर्जुना ! जो पुरुष संपूर्ण कर्तव्यकर्मे केवळ माझ्यासाठीच करणारा आहे, मत्परायण आहे, माझा भक्त आहे, आसक्तिरहित आहे आणि सर्व प्राणिमात्रांशी वैरभावारहित आहे, तो अनन्य भक्तियुक्त पुरुष मलाच प्राप्त होतो.'

जर असे म्हटले की, 'ह्या श्लोकात ज्या तीन गोष्टी सांगितल्या आहेत त्या म्हणजे - भगवंतांसाठी कर्म करणे, भगवत्परायण होणे, आणि भगवद्भक्त होणे, ह्या तीनही गोष्टींच्या अनुष्ठानामुळे भगवंतांची प्राप्ती होते की, केवळ एकाच गोष्टीच्या अनुष्ठानामुळे सुद्धा? तर ह्याचे उत्तर असे आहे की, तीनही गोष्टींमुळे भगवत्प्राप्ती होईल यात तर सांगायचेच काय, परंतु कोणत्याही एकीच्या अनुष्ठानामुळे देखील होऊ शकते. केवळ भगवंतांसाठी कर्म केल्यामुळे देखील मनुष्याला भगवत्प्राप्तीरूप सिद्धी प्राप्त होण्याचा निर्देश भगवंतांनी गीतेच्या बाराव्या

अध्यायातील दहाव्या श्लोकात केला आहे.

**मदर्थमपि कर्माणि कुर्वन् सिद्धिमवाप्स्यसि ।।**

'हे अर्जुना ! जो पुरुष संपूर्ण कर्तव्यकर्मे केवळ माझ्यासाठीच करणारा आहे, मत्परायण आहे, माझा भक्त आहे, आसक्तिरहित आहे आणि सर्व प्राणिमात्रांशी वैरभावरहित आहे, तो अनन्य भक्तियुक्त पुरुष मलाच प्राप्त होतो.'

जर असे म्हटले की, 'ह्या श्लोकात ज्या तीन गोष्टी सांगितल्या आहेत त्या म्हणजे - भगवंतांसाठी कर्म करणे, भगवत्परायण होणे, आणि भगवद्भक्त होणे, ह्या तीनही गोष्टींच्या अनुष्ठानामुळे भगवंतांची प्राप्ती होते की, केवळ एकाच गोष्टीच्या अनुष्ठानामुळे सुद्धा? तर ह्याचे उत्तर असे आहे की, तीनही गोष्टींमुळे भगवत्प्राप्ती होईल यात तर सांगायचेच काय, परंतु कोणत्याही एकीच्या अनुष्ठानामुळे देखील होऊ शकते. केवळ भगवंतांसाठी कर्म केल्यामुळे देखील मनुष्याला भगवत्प्राप्तीरूप सिद्धी प्राप्त होण्याचा निर्देश भगवंतांनी गीतेच्या बाराव्या अध्यायातील दहाव्या श्लोकात केला आहे -

**मदर्थमपि कर्माणि कुर्वन् सिद्धिमवाप्स्यसि ।।**

'हे अर्जुना ! तू माझ्यासाठी कर्म करत असताना सुद्धा मला प्राप्तस्वरूपी सिद्धीला प्राप्त होशील.'

तसेच केवळ भगवत्परायण होऊन सुद्धा भगवंतांची प्राप्ती होऊ शकते. भगवंतांनी म्हटले आहे -

**मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः ।**
**स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यान्ति परां गतिम् ।।**

(गीता ९ । ३२)

'हे अर्जुना ! स्त्री, वैश्य, शूद्र तसेच पापयोनी म्हणजे चाण्डाल इत्यादी जे कोणी असतील ते सुद्धा मला शरणागत होऊन परमगतीला प्राप्त होतात.'

ह्याच प्रमाणे केवळ भगवद्भक्तिमुळे सुद्धा भगवत्प्राप्ती होते -

**देवान्देवयजो यान्ति मद्भक्ता यान्ति मामपि ।।**

(गीता ७ । २३ चा उत्तरार्ध)

'देवतांची पूजा करणारे देवतांना प्राप्त होतात आणि माझे भक्त - त्यांना पाहिजे त्या प्रकारे मला भजोत, शेवटी ते मलाच प्राप्त होतात.'

असे भक्त चार प्रकारचे असतात -

**चतुर्विधा भजन्ते मां जनाः सुकृतिनोऽर्जुन ।**
**आर्तो जिज्ञासुरर्थार्थी ज्ञानी च भरतर्षभ ।।**

(गीता ७ । १६)

'हे भरतवंशीयांमध्ये श्रेष्ठ अर्जुना ! उत्तम कर्म करणारे अर्थार्थी, आर्त, जिज्ञासू आणि ज्ञानी - असे चार प्रकारचे भक्त माझी भक्ती करतात.'

ह्या चौघातही अर्थार्थ्यापेक्षा आर्त, आर्तापेक्षा जिज्ञासू आणि जिज्ञासूपेक्षा ज्ञानी (निष्काम) भक्त श्रेष्ठ आहे. अर्थार्थी भक्तापेक्षा आर्त अशासाठी श्रेष्ठ आहे की तो स्त्री, पुत्र, धन इत्यादींची गोष्टच कशाला राज्यभोग इत्यादींच्या प्राप्तीची देखील भगवंतांकडून अपेक्षा करत नाही - जसे ध्रुवाने[१] इच्छा केली होती, परंतु द्रौपदी[२] प्रमाणे एखाद्या भयंकर ऐहिक संकटात सापडल्यावर ते निवारण करण्याची याचना करतो. पण जिज्ञासू तर मोठ्यात मोठे ऐहिक संकट कोसळल्यावर सुद्धा त्या संकट निवारणासाठी प्रार्थना करत नाही, उलट भक्त उद्धवा[३] प्रमाणे संसार-सागरातून आत्म्याचा उद्धार करण्यासाठी परमात्म्याला

---

१. भक्त ध्रुवावरील प्रसंग श्रीमद्भागवताच्या, चतुर्थस्कंधाच्या ८ व्या व ९ व्या अध्यायात पाहू शकता.

२. द्रौपदीवरील हा प्रसंग महाभारत, सभापर्वातील ६८ व्या अध्यायात वाचू शकता.

३. भक्त उद्धवावरील हा प्रसंग श्रीमद्भागवत, एकादश स्कंधातील सातव्या अध्यायापासून एकोणतिसाव्या अध्यायापर्यंत पाहू शकता.

तत्त्वत: जाणण्याची इच्छा करतो म्हणून आर्तापेक्षा जिज्ञासू श्रेष्ठ आहे. परंतु भक्त प्रह्लादा[१] प्रमाणे निष्काम ज्ञानी भक्त तर आपल्या मोक्षासाठी सुद्धा याचना करत नाही. म्हणून भगवंतांनी निष्काम ज्ञानी भक्ताला सर्वात उत्तम मानले आहे.

या चौघात ज्ञानी भक्त भगवंतांना अत्यंत प्रिय आहे कारण की ज्ञानी मनुष्याला भगवंत अत्यंत प्रिय आहेत. सातव्या अध्यायातील सतराव्या श्लोकात भगवंत स्वत: म्हणतात -

**तेषां ज्ञानी नित्ययुक्त एकभक्तिर्विशिष्यते ।**
**प्रियो हि ज्ञानिनोऽत्यर्थमहं स च मम प्रियः ।।**

'त्यांच्यापैकी सदैव माझ्यात एकत्वभावने स्थित अनन्यप्रेम भक्तियुक्त ज्ञानी भक्त अत्युत्तम आहे; कारण की मला तत्त्वयुक्त जाणणाऱ्या ज्ञान्याला मी अत्यंत प्रिय आहे; म्हणून तो ज्ञानी भक्त मला अत्यंत प्रिय आहे.'

कारण की भगवंतांचे हे ब्रींद आहे की जो माझी जशा प्रकारे भक्ती करेल त्याची मी त्याच प्रकारे भक्ती करतो (गीता ४ । ११).

एवढेच नव्हे, जो भगवंतांना प्रेमाने भजतो, त्याला भगवंत आपल्या हृदयात बसवितात. भगवंतांनी गीतेतील नवव्या अध्यायातील एकोणतिसाव्या श्लोकात म्हटले आहे की 'जे भक्त प्रेमाने मला भजतात ते माझ्यात आहेत व मी सुद्धा त्यांच्या ठिकाणी प्रत्यक्ष प्रकट झालेलो असतो.'

जर असे विचारले गेले की 'अशा ज्ञानी निष्काम भक्ताशिवाय दुसरे श्रेष्ठ भक्त नाहीत काय? आणि त्यांचा उद्धार होत नाही कां? तर अशी गोष्ट नाही. हे सगळे भक्त श्रेष्ठ आहेत आणि सर्वांचा उद्धार होत असतो, परंतु ज्ञानी निष्काम भक्त सर्वात उत्तम आहे. ज्ञानी

---

१. भक्त प्रह्लादाविषयीचा हा प्रसंग श्रीमद्भागवत, सप्तम स्कंधातील ४ थ्या पासून १० व्या अध्यायापर्यंत पाहू शकता.

निष्काम भक्ताला तर भगवंतांनी आपले स्वरूप म्हणूनच दर्शविले आहे-

**उदाराः सर्व एवैते ज्ञानी त्वात्मैव मे मतम् ।**
**आस्थितः स हि युक्तात्मा मामेवानुत्तमां गतिम् ।।**

(गीता ७ । १८)

'हे सगळे उदार आहेत, परंतु ज्ञानी तर साक्षात माझेच रूप आहे - असे माझे मत आहे; कारण तो मद्गत मन-बुद्धि असणारा ज्ञानी भक्त अत्यंत उत्तम गतिस्वरूप माझ्याच ठिकाणी उत्तम प्रकारे स्थित आहे.

उदार म्हणजे श्रेष्ठ. भगवंतांच्या सांगण्यातील भाव असा आहे की 'ते भक्त प्रथम मला भजतात, तेव्हा मी मग त्यांना भजतो, तसेच ते आपला बहुमोल वेळ माझ्यावर श्रद्धा-विश्वास ठेवून समर्पित करतात, हे त्यांचे औदार्य आहे; म्हणून ते श्रेष्ठ आहेत आणि माझी भक्ती सकाम निष्काम किंवा इतर कोणत्याही भावाने का केली जाईना, माझ्या भक्ताचा उद्धार होतोच होतो. (गीता ७ । २३); परंतु प्रेम आणि निष्कामभावाची त्यांच्या ठिकाणी न्यूनता असल्यामुळे माझ्या प्राप्तीसाठी उशीर होऊ शकतो. माझ्या उपासनेची गोष्ट कशाला? जे दुसऱ्या देवतांची उपासना करतात, ते देखील माझीच उपासना करतात, परंतु ते मला तत्त्वतः जाणत नसल्यामुळे इहलोक किंवा स्वर्ग इत्यादी परलोकरूपी नाशवंत फळाची प्राप्ती करून घेतात.'

**अन्तवत्तु फलं तेषां तद् भवत्यल्पमेधसाम् ।**

(गीता ७ । २३ चा पूर्वार्ध)

'कारण की त्या अल्पबुद्धी असलेल्यांचे ते फळ नाशवंत आहे.'

सातव्या अध्यायातील पहिल्या श्लोकात ज्या समग्र रूपाला जाणण्याचा निर्देश केला आहे, भगवंतांनी त्याचा हाच अभिप्राय दाखविलेला आहे की जे काही आहे ते माझ्याहून वेगळे नाही (गीता ७ । ७) आणि सर्व काही माझेच स्वरूप आहे. (गीता ७ । १९). तसेच ह्या तत्त्वाला जाणणारा निष्पाप आणि रागद्वेषजनित मोहापासून मुक्त भगवद्भक्त भगवंतांना शरण जाऊन भगवंतांच्या संपूर्ण स्वरूपाला

जाणतो (गीता ७ । २८ - ३०).

अशा ज्ञानी भगवत्प्राप्त महात्मा भक्ताची जी स्थिती आहे, तिची भगवंतांनी फार मोठी प्रशंसा केली आहे. (गीता १२ । १३ ते १९). भगवंतांनी त्याला आपला प्रिय भक्त म्हटले आहे; परंतु जो साधक त्या ज्ञानी भक्ताच्या लक्षणांना आपले लक्ष्य बनवून त्यानुसार श्रद्धापूर्वक साधना करतो, त्याला तर भगवंतांनी आपला अतिशय लाडका असे म्हटले आहे. कारण त्याने भगवंतांवर श्रद्धा - विश्वास ठेवून आपले जीवन भगवंतांना समर्पित केले आहे. भगवंत म्हणतात -

**ये तु धर्म्यामृतमिदं यथोक्तं पर्युपासते ।**
**श्रद्दधाना मत्परमा भक्तास्तेऽतीव मे प्रियाः ।।**

(गीता १२ । २०)

'परंतु जे श्रद्धायुक्त पुरुष मत्परायण होऊन उपरनिर्दिष्ट ह्या धर्ममय अमृताचे निष्काम प्रेमभावाने सेवन करतात. ते भक्त तर मला अत्यंत प्रिय आहेत.'

जेव्हा केवळ मन-बुद्धीला भगवंतांच्या ठिकाणी लावण्यामुळेच भगवंतांची प्राप्ती होते (गीता ८ । ७; १२ । ८), तेव्हा मग जो भक्त सर्वस्व भगवंतांना समर्पण करून सर्व प्रकारे भगवंतांना भजतो, त्याच्या उद्धाराच्या बाबतीत काय सांगावे !

*****

# गीतोक्त अनन्य प्रेमाचे साधन आणि त्याचे फळ

एका परमेश्वराशिवाय माझे कोणीही नाही, तेच माझे सर्वस्व आहे – असे जाणून थोडासा सुद्धा स्वार्थ, अभिमान आणि कामना न बाळगता एकमात्र भगवंतांमध्येच अतिशय श्रद्धेनेयुक्त अनन्य प्रेम करणे आणि भगवंतांहून इतर कोणत्याही वस्तूवर किंचितही प्रेम न करणे - हे अनन्य प्रेम होय. अनन्य प्रेमाच्या साधनाचे स्वरूप आणि फळ गीतेमध्ये अशाप्रकारे सांगितले गेले आहे -

**मच्चित्ता मद्गतप्राणा बोधयन्तः परस्परम् ।**
**कथयन्तश्च मां नित्यं तुष्यन्ति च रमन्ति च ।।**
**तेषां सततयुक्तानां भजतां प्रीतिपूर्वकम् ।**
**ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयान्ति ते ।।**

(१० । ९-१०)

'सदैव माझ्याच ठिकाणी चित्त लावणारे आणि माझ्याच ठिकाणी प्राणार्पण करणारे भक्तजन माझ्या भक्तीच्या चर्चेद्वारा आपापसात माझ्या प्रभावाला जाणून घेत तसेच गुण प्रभावासह माझे वर्णन करतच सदैव संतुष्ट होतात आणि वासुदेव असलेल्या माझ्या ठिकाणी सदैव रममाण असणाऱ्या आणि प्रेमपूर्वक भजणाऱ्या भक्तांना मी तो तत्त्वज्ञानरूप योग देतो की ज्यामुळे ते मलाच प्राप्त होतात.'

येथे भगवंतांनी नवव्या श्लोकात अनन्य प्रेमी भक्तांच्या लक्षणांच्या रूपाने सहा साधने सांगितली आहेत व दहाव्या श्लोकात त्यांचे फळ सांगितले आहे. आता त्यांच्या विषयी थोड्या विस्ताराने विचार केला जात आहे.

## 'मच्चित्ताः'

जसे संसारी लोक रात्रंदिवस संसारातच गुंतलेले असतात,

तसेच भगवंतांचे प्रेम असलेले भक्त भगवंतांमध्येच गुंतलेले असतात, तसेच ज्याप्रमाणे संसारी माणसे नेहमी संसाराचेच चिंतन करत राहतात त्याप्रमाणेच भगवद्भक्त नेहमी मनाने भगवंतांचेच चिंतन करत राहतात. भगवंतांना भेटण्याची इच्छा करणारे साधक भक्त मनाने भगवंतांना आवाहन करून भगवंतांचे दर्शन, भाषण, स्पर्श, संभाषण, पूजन, आदर, सत्कार आणि मनोरंजन करत राहतात. सर्व प्रथम भक्त भगवान श्रीशंकर, श्रीविष्णू, श्रीराम, श्रीकृष्ण इत्यादी आपल्या इष्ट देवाला आवाहन करून पायापासून तर मस्तकापर्यंत वस्त्रे, आभूषणे, आयुध इत्यादींसह त्यांच्या स्वरूपाचे श्रद्धा प्रेमयुक्त चिंतन करतो. नंतर मनानेच आपल्यासमोर प्रकट झालेल्या भगवंतांच्या मानसिक स्वरूपाचे, मानसिक साहित्याने आणि आपल्या मानसिक शरीराने षोडश उपचारांनी पूजन करतो. त्यानंतर आत्मीयतेने स्तुति-प्रार्थना करतो तसेच मनानेच त्याच्याबरोबर आमोद, प्रमोद आणि हास्यविनोद करत आश्रमात, घरी किंवा वनात विहरत राहतो. जेथे जेथे भगवंतांचे चरण टेकले जातात त्या त्या भूमीत भगवंतांचा प्रभाव प्रवेश करतो, म्हणून त्या भूमीची धूळ अत्यंत पवित्र आणि कल्याणकारी झाली आहे असे मानले जाते, ज्या बिछान्यावर, गादीवर किंवा सतरंजीवर बसून भगवंतांबरोबर भक्त मनाने संभाषण करतो त्या सतरंजीत किंवा गादी इत्यादीत जणू भगवंतांच्या दिव्य गुण-प्रभावाच्या परमाणूंनी प्रवेश केला आहे, म्हणून त्या सतरंजीला किंवा गादीला स्पर्श केल्याने त्याच्या शरीरावर रोमांच उभे राहतात. ज्याप्रमाणे दोन मित्र आपापसात प्रेमाच्या गप्पा गोष्टी करतात, त्याचप्रमाणे तो भगवंतांबरोबर दिव्य प्रेमाच्या गप्पा गोष्टी मनानेच करत राहतो. प्रेमपूर्ण नयनांनी ते एकमेकांकडे पाहातात. भगवंतांच्या हृदयात व डोळ्यात समता, शांती, ज्ञान, प्रेम इत्यादी अनंत दिव्य गुण भरलेले आहेत, भगवंत माझ्यावर अनुग्रहपूर्ण दृष्टीने पाहातात, त्यामुळे ते गुण माझ्या मन, बुद्धी, इंद्रिये, शरीर आणि रोमरोमातून अशाप्रकारे प्रवेश करत आहेत तेथे समता, शांती, ज्ञान, आनंद आणि प्रसन्नतेला सीमाच

उरत नाही. जणू 'मी गुणसागरांत डुंबत आहे' असा त्याला प्रत्यक्ष अनुभव येत असतो. 'भगवंतांच्या नेत्रांतील दृष्टी जेथे जेथे पडते त्या सर्व वस्तू दिव्य अलौकिक कल्याणकारक होतात.' असा त्याला अनुभव येऊ लागतो. मग असे समजा की भगवंत आणि भक्त दोघेही बरोबरच जेवायला बसले आहेत आणि एकमेकांना वाढत आहेत. भगवंतांच्या स्पर्शाने ते भोजन दिव्य अलौकिक रसमय, अत्यंत मधुर झाले आहे. ते भोजन केल्यामुळे संपूर्ण शरीराभर एवढी प्रसन्नता, आनंद, शांती आणि तृप्ती होत असते की त्याला काही प्रमाणच नाही. भगवंतांच्या अंगाने ज्या वस्तूला स्पर्श होतो ती सुद्धा दिव्य, रसमय, आनंदमय, शांतीपूर्ण, प्रेममय आणि कल्याणमय होऊन जाते. भगवंत आपल्या मनाने ज्याचे स्मरण करतात ती वस्तू सुद्धा अत्यंत शांतीमय, परमानंदमय आणि कल्याणदायिनी होऊन जाते. भगवंतांच्या ठिकाणी दिव्य सुगंध येत असतो, तो नाकाला अमृताप्रमाणे असतो. भगवंतांची वाणी फारच नाजूक आणि मधुर असते ती कानांना अमृताप्रमाणे असते. भगवंतांचा चरणस्पर्श हातांना अमृताप्रमाणे असतो. भगवंतांचे दर्शन नेत्रांना अमृताप्रमाणे असते. भगवंतांचे चिंतन मनाला अमृताप्रमाणे असते. भगवंतांच्या साकार-निराकार, सगुण-निर्गुण स्वरूपाचे जे तात्विक ज्ञान आहे, ते बुद्धिला अमृताप्रमाणे असते. अशाप्रकारे त्यांचे दर्शन, भाषण, स्पर्श, संभाषण, चिंतन, आमोद, प्रमोद, सगळे काही रसमय, आनंदमय, प्रेममय आणि अमृतमय आहे. भगवंतांचे नाम, रूप, लीला, धाम - सगळेच अत्यंत मधुर, दिव्य, अलौकिक आणि रसमय आहे. अशाप्रकारे चिंतन करताना ते प्रेमळ भक्त आपल्या मनाला संपूर्णपणे भगवंतमय करून टाकतात. भगवंतांशिवाय दुसऱ्या कोणत्याही पदार्थात त्यांच्या मनाची आसक्ती आणि वृत्ती राहात नाही; म्हणून ते भगवंतांना एक क्षणभर सुद्धा विसरू शकत नाहीत, एकमात्र भगवंतांच्या ठिकाणी त्यांचे चित्त तन्मय होऊन अखंडपणे लागलेले असते.

## 'मद्गतप्राणाः'

ते प्रेमळ भक्त वर निर्देश केलेल्या भगवंतांचे, श्रीशंकर, श्रीविष्णू, श्रीराम इत्यादी आपल्या इष्ट देवाच्या साक्षात दर्शनासाठी आपले जीवन, धन, प्राण - सर्वस्व समजून, आपले जीवन त्यांनाच अर्पण करतात. नंतर त्यांच्या सर्व कृती भगवंतांसाठीच होऊ लागतात. त्यांचे जीवन भगवंतांसाठीच असते. भगवंतांचा वियोग क्षणभरासाठी सुद्धा असह्य होतो. भगवद्दर्शनाशिवाय त्यांना चैन पडत नाही. रात्री झोपही येत नाही किंवा दिवसा भूकही लागत नाही. भगवंतांशिवाय कोणतीही वस्तू त्यांना प्रिय वाटत नाही. भगवंतांच्या विरहात ते पाण्याशिवाय असलेल्या मासोळीप्रमाणे तडफडू लागतात. जसे मासोळीचे प्राण जलातच असतात त्याप्रमाणे त्यांचे प्राण भगवंतांमध्येच असतात. ते गोपींप्रमाणे विरहाने व्याकूळ, भ्रमिष्ट आणि उन्मत्ताप्रमाणे भगवंतांना शोधत फिरतात. अशाप्रकारे ते आपले जीवन-प्राण इत्यादी सर्व काही भगवंतांवर ओवाळून टाकतात. त्यांचे सर्व काही भगवंतांना समर्पित होते. त्यांना खाणे पिणे, बोलणे चालणे, इत्यादींची शुद्धच राहात नाही. यक्ष, राक्षस, देवता, मनुष्य, पशू इत्यादी कोणाचीही त्यांना पर्वा नसते. ते सर्वांपासून निर्भय होऊन फिरत असतात. शास्त्रमर्यादा किंवा लोकमर्यादा यांचेही त्यांना भान राहात नाही. मन, तन, धन, जीवन, प्राण, सर्वस्व भगवंतांना अर्पण केल्यामुळे भगवंतांशिवाय इतर कशातच त्यांचे प्रेम आणि ममत्व राहात नाही. ते फक्त भगवंतांवर अवलंबून राहतात.

अशा प्रेमळ भक्तांसंबंधी श्री सुंदरदासांनी असे म्हटले आहे -

**न लाज तीन लोककी न बेदको कह्यो करै ।**
**न शंक भूत प्रेतकी न देव यक्ष तें डरै ।।**
**सुनै न कान और की द्रसै न और इच्छना ।**
**कहै न मुख और बात भक्ति प्रेम लच्छना ।।**

## 'बोधयन्तः परस्परम्'

ज्याप्रमाणे गोपिका भगवंतांचे तत्त्व रहस्य एकमेकींना सांगत असत आणि समजावित असत, त्याचप्रमाणे भगवत्प्रेमात गुंग झालेले प्रेमळ भक्त आपल्या प्रेमळ मित्रांबरोबर भगवंतांच्या नाम, रूप, लीला, धाम, प्रेम, गुण, प्रभावांची चर्चा करत करत एकमेकांना त्यांचे तत्त्व-रहस्य समजावून सांगत असतात आणि आपल्या परमप्रिय भगवंतांच्या लीला, चरित्र, महिमा तसेच भगवंतांचे माधुर्य, रूप-लावण्य, वस्त्रे, आभूषणे, नाम आणि गुण-प्रभाव इत्यादींसंबंधी आपापसात गप्पागोष्टी करता करता त्या विशुद्ध परमप्रेम आणि आनंदात तन्मय आणि मुग्ध होऊन जातात.

## 'कथयन्तश्च माम्'

अशाप्रकारे ते भक्त भगवंतांच्या प्रेमळ भक्तांसमोर तसेच आपल्या प्रिय मित्रांसमोर भगवंतांच्या नामांचे कीर्तन आणि गुणांचे गायन करत राहतात. तसेच भगवंतांच्या साकार, निराकार, सगुण, निर्गुण स्वरूपाच्या तत्त्व-रहस्याचे, भगवंतांच्या नित्य परमधामाच्या गुण-प्रभाव-तत्त्व रहस्याचे तसेच भगवंतांच्या दिव्य, अलौकिक अनन्त नानाविध गुणांच्या तत्त्व-रहस्याचे ग्रंथ, व्याख्यान आणि पत्रव्यवहार इत्यादींद्वारा श्रद्धा-प्रेमपूर्वक वर्णन करत राहतात. असे करत असताना ते भगवत्प्रेमाच्या आनंदात विह्वल आणि मग्न होतात. तरी सुद्धा ह्या सगळ्यांचे वर्णन करत असताना ते कधीच कंटाळत नाहीत.

## 'नित्यं तुष्यन्ति च'

वर सांगितलेल्या सर्व गोष्टींनी ते भक्त प्रत्येक वेळी संतुष्टच राहतात. ह्यापेक्षा अधिक आनंददायक असे ते कोणालाच मानत नाहीत. भगवंतांच्या तत्त्व-रहस्याला अधिकाधिक जाणून ते तृप्त आणि समाधानी होतात, परमशांती आणि परमानंदाच्या दिव्य रसात नेहमीच मग्न राहतात. ते आमोद प्रमोदपूर्वक प्रत्येक वेळी इतके आनंदित असतात की सर्वात मोठी आपत्ती येऊन कोसळली तरी सुद्धा आपल्या

आनंदमय स्थितीपासून ढळत नाहीत, उलट आपल्या इष्टदेवतेच्या नाम, रूप, लीला, गुण, प्रभावांचे स्मरण करत परमानंदात मग्न होतात. आपल्या परमप्रिय इष्टदेव परमात्म्याच्या प्रेममय लीला आणि चरित्रांचे मनानेच अवलोकन करकरून सदैव परमसंतुष्ट राहतात तसेच भगवंतांच्या अत्यंत मधुर स्वभाव, महिमा आणि रूपमाधुर्याचे तत्त्व रहस्य जाणून परमानंदात गुंग राहातात.

## 'रमन्ति च'

अत्यंत प्रेमळ असलेले ते भक्त भगवंतांबरोबरच अलौकिक दिव्य आमोद प्रमोदपूर्वक क्रिडा करत राहातात. ते सदैव एका भगवंतांमध्येच सर्वथा रममाण होतात. आपल्या परमप्रिय भगवंतांपासून एक दिव्य असा अलौकिक सुगंध येत असतो. त्याचा नाकाने आस्वाद घेणे म्हणजे नाकाद्वारे रममाण होणे होय. भगवंतांच्या प्रसादाला प्राप्त करून घेऊन जिभेने त्याचा आस्वाद घेणे म्हणजे जिभेने रममाण होणे होय. भगवंतांच्या डोळ्यांमध्ये डोळे मिसळून, त्यांच्या डोळ्यांमध्ये जी एक अलौकिक दिव्य प्रेम, रस आणि ज्ञानयुक्त ज्योति असते ती एकटक पाहाणे म्हणजे डोळ्यांद्वारा रममाण होणे होय. भगवंतांच्या चरणांना हातांनी स्पर्श करणे म्हणजे हातांनी रममाण होणे होय. भगवंतांची नूपुरे, बासरी, इत्यादींच्या ध्वनींचा आणि त्यांच्या प्रेमपूर्ण कोमल मधुर वाणीचा वारंवार श्रवणाने आस्वाद घेणे म्हणजे कानांच्या द्वारे रममाण होणे होय. भगवंतांच्या गुण प्रभाव, रूप, लीला इत्यादींचे चिंतन करणे म्हणजे मनाने भगवंतांमध्ये रममाण होणे होय तसेच भगवंतांच्या सगुण-निर्गुण, साकार-निराकार स्वरूप तत्त्व-रहस्याला जाणून मुग्ध होत राहाणे म्हणजे बुद्धीच्या द्वारे त्यांच्यात रममाण होणे होय. अशाप्रकारे भगवंतांचे आघ्राण, प्रसाद भक्षण, दर्शन, स्पर्श, भाषण, श्रवण, चिंतन मनन इत्यादी सर्व परम मधुर, रसमय, प्रेममय, अमृतमय, आनंदमय आहे - असे जाणून ते प्रेमळ भक्त आपल्या मन, बुद्धी आणि इंद्रियांचा भगवंतांशी संबंध जोडून त्यांचे दर्शन, भाषण इत्यादी करण्यात त्यांच्यापासून

अत्यंत अनुपम रसास्वाद घेत भगवंतांच्याच ठिकाणी सदासर्वदा रममाण होतात. भगवंतांच्या ठिकाणी गोपींचे अत्यंत विशुद्ध असे दिव्य प्रेम होते. त्यांनी मन, प्राण आणि सर्व काही क्रिया एकमेव आपले प्राणधन प्रेमास्पद भगवान श्रीकृष्णांनाच अर्पण केलेले होते - आणि भगवंतांचे गायन करत त्यांच्या प्रेमातच त्या सदैव मग्न असत. भागवतकार निर्देश करतात -

**तन्मनस्कास्तदालापास्तद्विचेष्टास्तदात्मिकाः ।**
**तद्गुणानेव गायन्त्यो नात्मागाराणि सस्मरुः ।।**

(श्रीमद्भा० १० । ३० । ४४)

'गोपींचे मन कृष्णमय झाले होते, त्यांच्या वाणीतून श्रीकृष्ण विषयक चर्चेशिवाय दुसरी कोणतीही गोष्ट निघत नव्हती. त्यांच्या शरीरातून केवळ श्रीकृष्णासाठी आणि श्रीकृष्ण विषयकच क्रिया होत होत्या. कुठवर सांगावे, त्यांचा आत्मा श्रीकृष्णमय होत होता. त्या फक्त श्रीकृष्णांच्या गुण आणि लीलांचेच गायन करत होत्या आणि त्यात इतक्या तन्मय होत होत्या की त्यांना आपल्या शरीराची आणि घराची शुद्ध देखील राहिली नाही.'

वरील पद्धतीने भगवंतांचे नाम, रूप, लीला, धाम, गुण, प्रभावाचे तत्त्व-रहस्य जाणून श्रद्धा विश्वास आणि अनन्य प्रेमाने सदैव मनाने चिंतन, दर्शन, भाषण चरणस्पर्श करणे म्हणजेच भगवंतांना प्रीतिपूर्वक, विशुद्ध, निष्काम भावाने भजणे होय. अशाप्रकारे भगवंतांना भजणारे भक्त मान, मोठेपणा, प्रतिष्ठा, ऐशआराम, उपभोग आणि त्रैलोक्याच्या वैभवाची आणि मुक्तीची देखील इच्छा करत नाहीत. ते केवळ विशुद्ध प्रेमासाठीच अनन्य भावाने भगवंतांची भक्ती करतात.

**न पारमेष्ठ्यं न महेन्द्रधिष्ण्यं न सार्वभौमं न रसाधिपत्यम् ।**
**न योगसिद्धीरपुनर्भवं वा मय्यर्पितात्मेच्छति मद्विनान्यत् ।।**

(श्रीमद्भा० ११ । १४ । १४)

'ज्याने आपल्या स्वत:ला माझ्या ठिकाणी अर्पण केले आहे, तो

माझ्याशिवाय ब्रह्मपदाची इच्छा करत नाही किंवा देवराज इन्द्रपदाची, त्याच्या मनात सार्वभौम सम्राट होण्याची इच्छा नसते किंवा तो रसातळाचा स्वामी होण्याचीही इच्छा करत नाही, तसेच तो योगमार्गातील मोठमोठ्या सिद्धींची किंवा मोक्षाची अभिलाषा करत नाही.'

असे अनन्य विशुद्ध प्रेम करणाऱ्या भक्ताला भगवंत असे बुद्धियोगरूपी विज्ञानासह ज्ञान देतात की, ज्यामुळे भगवंतांच्या साकार-निराकार, सगुण-निर्गुण स्वरूपाचे तत्त्व-रहस्य संपूर्णपणे जाणले जाते आणि त्याचे फलस्वरूप म्हणजे त्याला अत्यंत प्रेमास्पद भगवंतांची प्राप्ती होते. तो आपल्या स्वत:ला विसरून जातो. शुद्धीवर आल्यानंतर त्याच्या सर्व क्रिया भगवंतांच्याच मन आणि संकेतानुसार कठपुतळीप्रमाणे सहजपणेच होत राहातात. मग भगवंतांच्या सगळ्या हालचाली भक्तासाठी व भक्ताच्या सर्व क्रिया भगवंतांसाठीच होतात. त्यांच्यात नित्य नवीन प्रेम सदैव समभावाने जागृत असते, त्या दोघांच्या हालचाली एकमेकांना आनंदित करण्यासाठीच असतात की ज्या एकमेकांसाठी लीला स्वरूप असतात. प्रेम प्रेमास्पद आणि प्रेमी - यांचे नाम-रूप वेगवेगळे आहे. परंतु खरे पाहता तिघेही एकच आहेत. ज्याप्रमाणे सुवर्णालंकारांची नावे वेगवेगळी असतात परंतु वस्तुत: ते सुवर्णच असते. अशाच प्रकारे अत्यंत दिव्य, चिन्मय, प्रेमस्वरूप परमात्माच प्रेमी, प्रेमास्पद आणि प्रेम या नावाने व्यक्त झाले आहेत. भक्ताच्या दृष्टीने तर भक्त प्रेमी, भगवंत प्रेमास्पद आणि त्यांचा संबंधच प्रेम आहे, तसेच भगवंतांच्या दृष्टीने भगवंत प्रेमी, भक्त प्रेमास्पद आणि त्यांचा संबंध म्हणजेच प्रेम होय, म्हणून भगवंतांच्या सगळ्या क्रिया भक्तासाठी लीलाच आहेत आणि भक्ताच्या सगळ्या क्रिया भगवंतांसाठी लीलाच आहेत. एकमेकांच्या क्रिया एकमेकांच्या आनंदासाठीच होत असतात.

येथे एकाला दुसऱ्याच्या बाबतीत लज्जा, मान, भय, आदर-सत्कार थोडेसुद्धा नसते. खरे पाहता ते एकच आहेत, म्हणून कोणी कोणाचा कशाने, कशासाठी लाज, मान, भीती, आदर-सत्कार

करायचा? दास्य आणि वात्सल्यभावात तर आदर-सत्कार आणि भय असते, पत्नीभावात सुद्धा आदर-सत्काराची भावना असते आणि सख्यभावात लाज असते, परंतु येथे तर परस्पर लज्जा, भय, मान, आदर-सत्काराचा किंचितही संबंध नाही राहात; कारण की भगवंतांची प्राप्ती होत असतांना दास्य, सख्य, पत्नीभाव, वात्सल्य, शान्त इत्यादी भावांचा त्या भक्तात समावेश होऊन जातो आणि तो केवळ विशुद्ध चिन्मय परमप्रेमस्वरूप भगवंतांना प्राप्त झाल्यामुळे ह्या भावांच्याही वर जातो. ही अत्यंत विशुद्ध दिव्य अलौकिक प्रेमाची प्राप्ती रहस्यमयी आहे. कोणीही वाचेने तिचे वर्णन करू शकत नाही.

*****

# अंतकाळी होणाऱ्या परमात्मचिंतनाचे महत्त्व

शास्त्रांमध्ये भगवंतांची निर्गुण आणि सगुण अशी दोन स्वरूपे सांगितली आहेत. या दोहोंत जो निर्गुण आहे, तो तर निराकार आहेच. सगुणाचे दोन प्रकार आहेत - १) सगुण निराकार २) सगुण-साकार. भगवंतांच्या या तीनही स्वरूपांपैकी कोणत्याही एकाचे जरी चिंतन करीत असताना जो मनुष्य देह सोडतो तो कायमचा या संसारातून मुक्त होऊन परब्रह्म परमात्म्याला मिळतो (त्याच्याशी एकरूप होतो). त्या परब्रह्म परमात्म्याच्या प्राप्तीलाच अव्यक्त, अक्षर, परमगति, परमधाम आदी अनेक नावांनी ओळखले जाते.

**अव्यक्तोऽक्षर इत्युक्तस्तमाहुः परमां गतिम् ।**
**यं प्राप्य न निवर्तन्ते तद्धाम परमं मम ।।**

(गीता ८ । २१)

"जो अव्यक्त 'अक्षर' या नावाने ओळखला गेला आहे, त्याच अक्षर नावाच्या अव्यक्त भावाला परमगती म्हणतात. तसेच जो सनातन अव्यक्त भाव प्राप्त केल्याने माणसे परत येत नाहीत तेच माझे परमधाम आहे."

भगवंत असे म्हणतात की जो माझे स्मरण करीत असताना मरतो तो मज परमात्म्याशी एकरूप होतो-

**अन्तकाले च मामेव स्मरन्मुक्त्वा कलेवरम् ।**
**यः प्रयाति स मद्भावं याति नास्त्यत्र संशयः ।।**

(गीता ८ । ५)

'जो मनुष्य अंतकाळीसुद्धा माझेच स्मरण करीत देहत्याग करतो तो माझ्या साक्षात्स्वरूपाला प्राप्त करतो. यात मुळीच संशय नाही.'

जर कोणी मनुष्य असे म्हणाला की भगवंतसुद्धा पक्षपाती

आहेत - जो त्याचे स्मरण करणारा आहे त्यांचा ते उद्धार करतात आणि स्मरण न करणाऱ्याचा उद्धार करत नाहीत. तर प्रत्यक्षात अशी गोष्ट नाही. भगवंत तर समदर्शी आहेत. पक्षपाती नाहीत. त्यांची तर सर्वांवर सारखीच कृपा आहे. परंतु एक सर्वसाधारण नियम असा आहे की मृत्युसमयी मनुष्य ज्या-ज्या देवता, मानव, पशू, पक्षी, वृक्ष किंवा पर्वत इ. चे स्मरण करीत देह-त्याग करतो, तेच रूप त्याला प्राप्त होते.

**यं यं वापि स्मरन्भावं त्यजत्यन्ते कलेवरम् ।**
**तं तमेवैति कौन्तेय सदा तद्भावभावितः ।।**

(गीता ८ । ६)

'हे कुन्तीपुत्र अर्जुना ! हा मनुष्य मृत्युसमयी ज्या-ज्या भावाचे स्मरण करताना देह त्याग करतो तो-तो भावच त्याला प्राप्त होतो. कारण की तो नेहमीच त्या भावात रममाण झाला आहे.'

भगवंत हा नियम सांगताना म्हणतात की -

**तस्मात्सर्वेषु कालेषु मामनुस्मर युध्य च ।**
**मय्यर्पितमनोबुद्धिर्मामेवैष्यस्यसंशयम् ।।**

(गीता ८ । ७)

'याकरिता हे अर्जुना ! तू सदासर्वकाळ माझे स्मरण कर आणि युद्ध सुद्धा कर. अशाप्रकारे माझ्यात समर्पित केलेल्या मन-बुद्धीने युक्त होऊन निश्चितपणे तू मलाच प्राप्त करशील.'

ज्याप्रमाणे भगवान् श्रीकृष्ण अर्जुनाच्या रथावर सारथ्याच्या रूपाने विराजमान असत त्याचप्रमाणे भगवंताला सर्वत्र आपल्याबरोबर समजण्यामुळे प्रत्येक वेळी त्या सगुण-साकार परब्रह्म स्वरूप भगवान श्रीकृष्णांचे चिंतन होणे स्वाभाविकच आहे आणि मनुष्य निरंतर ज्या (गोष्टीचे) वस्तूचे चिंतन करीत असतो त्याच वस्तूची अंतकाळी देखील स्वाभाविकपणे आठवण होते. म्हणून भगवंतांच्या सगुण-साकार स्वरूपाचे चिंतन करीत जो मनुष्य देहत्याग करतो तो भगवंतांचे सगुणस्वरूप प्राप्त करतो - यात शंका नाही.

ही गोष्ट सांगितल्यावर आता सगुण निराकाराच्या चिंतनामुळे परमेश्वराची प्राप्ती होते हे सांगितले जात आहे. सर्वव्यापी सगुण निराकार रूप, परमदिव्यपुरुष परमात्म्याचे चिंतन करीत असताना जो मनुष्य मरतो तो देखील त्या चिंतनाच्या प्रभावामुळे परमेश्वराला प्राप्त होतो.

**अभ्यासयोगयुक्तेन चेतसा नान्यगामिना ।**
**परमं पुरुषं दिव्यं याति पार्थानुचिन्तयन् ।।**
**कविं पुराणमनुशासितारमणोरणीयांसमनुस्मरेद् यः ।**
**सर्वस्य धातारमचिन्त्यरूपमादित्यवर्णं तमसः परस्तात् ।।**
**प्रयाणकाले मनसाचलेन भक्त्या युक्तो योगबलेन चैव ।**
**भ्रुवोर्मध्ये प्राणमावेश्य सम्यक् स तं परं पुरुषमुपैति दिव्यम् ।**

(गीता ८ । ८-१०)

'हे पार्थ ! असा नियम आहे की परमेश्वराच्या ध्यानाचे अभ्यासरूप योगयुक्त, दुसरीकडे न जाणाऱ्या मनाने, अखंड चिंतन करीत असलेला मनुष्य परमदिव्य पुरुषाला अर्थात परमेश्वराला प्राप्त होतो. जो पुरुष सर्वज्ञ, सर्वांचा नियन्ता, सूक्ष्माहून अतिसूक्ष्म अशा सर्वांचे धारण-पोषण करणाऱ्या, अचिन्त्य स्वरूप, सूर्याप्रमाणे नित्य चेतन, प्रकाशरूप आणि अविद्येहून अति पलिकडे, शुद्ध सच्चिदानंदघन परमेश्वराचे स्मरण करतो तो भक्तियुक्त पुरुष अंतकाळीदेखील योगबलाने भृकुटीच्या मध्यभागी अतिशय उत्तमरीतीने प्राण ठेवून परत निश्चल मनाने स्मरण करीत असताना त्या दिव्यस्वरूप परमपुरुष परमात्म्यालाच प्राप्त होतो.'

तो परमदिव्य पुरुष परमात्मा अव्यक्त, निराकार, सर्वव्यापी आहे. हे संपूर्ण जग त्या परमात्म्याच्याच एका अंशात भरून राहिले आहे. ज्याप्रमाणे वायु, तेज, जल व पृथ्वी या चार महाभूतांचा समूह एका अव्यक्त निराकार आकाशाच्या अंतरंगातच आहे आणि आकाश या चौघांत व्यापले आहे त्याचप्रमाणे परमेश्वर संपूर्ण चराचर प्राणीमात्रांत अंतर्बाह्य व्यापला आहे आणि सर्व प्राणीमात्रांचा समूह त्या परमात्म्याच्याच

कोणत्या तरी एका अंशात आहे -

**पुरुषः स परः पार्थ भक्त्या लभ्यस्त्वनन्यया ।**
**यस्यान्तःस्थानि भूतानि येन सर्वमिदं ततम् ।।**

(गीता ८ । २२)

'हे पार्थ ! ज्या परमात्म्याच्या अंतर्गत सर्व प्राणीमात्र आहे आणि ज्या सच्चिदानन्दघन परमात्म्यानेच हे सर्व जग परिपूर्ण आहे तो सनातन अव्यक्त परमपुरुष परमात्मा तर अनन्य भक्तीनेच प्राप्त होणे योग्य आहे.'

ज्याप्रमाणे मनुष्य सगुण-साकार आणि सगुण-निराकाराच्या चिंतनाने परमेश्वरला प्राप्त होतो, त्याप्रमाणे निर्गुण-निराकार ब्रह्माचे चिंतन करीत असलेला जो मनुष्य शरीराचा त्याग करतो तो देखील परमगतीस्वरूप निर्गुण सच्चिदानंदघन ब्रह्माला प्राप्त होतो. त्या परम अक्षर स्वरूप परमात्म्याचा महिमा सांगताना भगवान म्हणतात की -

**यदक्षरं वेदविदो वदन्ति विशन्ति यद्यतयो वीतरागाः ।**
**यदिच्छन्तो ब्रह्चर्यं चरन्ति तत्ते पदं संग्रहेण प्रवक्ष्ये ।।**

(गीता ८ । ११)

'वेद जाणणारे विद्वान ज्या सच्चिदानंदघनरूप परमपदाला अविनाशी म्हणतात, आसक्तिरहित प्रयत्नशील संन्याशी महात्माजन ज्यात प्रवेश करतात आणि ज्या परमपदाची इच्छा करणारे ब्रह्मचारी लोक ब्रह्मचर्याचे पालन करतात, त्या परमपदाला मी तुला थोडक्यात सांगतो.'

या निर्गुण निराकार परमात्म्यालाच परम अक्षर ब्रह्माच्या नावाने म्हटले गेले आहे.

**'अक्षरं ब्रह्म परमम्'** (गीता ८ । ३ प्रथम पाद)

या अक्षर ब्रह्माचेच नाव **'ओम्'** आहे. याकरिता अंतकाळी ओंकाराचे उच्चारण करीत असताना त्याच्या अर्थरूप मज सच्चिदानन्दघन निर्गुण निराकार ब्रह्माचे चिंतन करत असताना जो मनुष्य देह त्याग

करतो तो परमगतीला अर्थात परमात्म्याला प्राप्त होतो -

**ओमित्येकाक्षरं ब्रह्म व्याहरन् मामनुस्मरन् ।**
**यः प्रयाति त्यजन्देहं स याति परमां गतिम् ।।**

(गीता ८ । १३)

अशाप्रकारे परमेश्वराच्या वरील तीन स्वरूपांतील कोणत्याही एकाचे देखील स्मरण करत असलेला मनुष्य याच ब्रह्माला प्राप्त होतो. अथवा अर्चिमार्गाने जाऊन ब्रह्म प्राप्त करतो -

**अग्निर्ज्योतिरहः शुक्लः षण्मासा उत्तरायणम् ।**
**तत्र प्रयाता गच्छन्ति ब्रह्म ब्रह्मविदो जनाः ।।**

(गीता ८ । २४)

'ज्या मार्गात ज्योतिर्मय अग्नि अभिमानी देवता आहे, दिवसाची अभिमानी देवता आहे, शुक्लपक्षाची अभिमानी देवता आहे आणि उत्तरायणाच्या सहा महिन्यांची अभिमानी देवता आहे, मृत झालेले त्या मार्गाने गेलेले ब्रह्मवेत्ता योगीजन वरील देवतांच्या द्वारा क्रमाने नेले जाऊन ब्रह्माला प्राप्त होतात.'

येथे **'ज्योतिः'** पद अग्निचे विशेषण आहे आणि **'अग्निः'** हे पद अग्नी अभिमानी देवतेचे वाचक आहे याचे स्वरूप दिव्य प्रकाशमय आहे. पृथ्वीच्या वर समुद्रासहित सर्व प्रदेशांवर याचा अधिकार आहे त्याचप्रमाणे उत्तरायणमार्गाने जाणाऱ्या अधिकाऱ्याचा दिवसाच्या अभिमानी देवतेशी संबंध करून देणे हेच ह्याचे काम आहे. उत्तरायणमार्गाने जाणारा जो उपासक रात्री शरीर त्याग करतो त्याला रात्रभर हा आपल्या अधिकारात ठेवून दिवस उगवल्यावर दिवसाच्या अभिमानी देवतेच्या स्वाधीन करतो आणि जो दिवसा मरतो त्याला ताबडतोब दिवसाच्या अभिमानी देवतेकडे सोपवून देतो.

अशाप्रकारे दिवसाच्या अभिमानी देवतेचा अधिकारी पृथ्वीलोकाची सीमा, अर्थात जेथपर्यंत आकाशात पृथ्वीचा वायुमण्डलाशी संबंध आहे तेथपर्यंत, आणि उत्तरायणाच्या मार्गाने जाणाऱ्या उपासकाचा

शुक्लपक्षाच्या अभिमानी देवतेशी संबंध करून देणे हेच ह्याचे काम आहे.

शुक्लपक्षाच्या अभिमानी देवतेचा अधिकार भूलोकीच्या सीमेच्या बाहेर अंतरिक्ष लोकात - ज्या लोकात १५ दिवसांचा दिवस व तितक्याच काळाची रात्र असते तेथपर्यंत आहे, आणि उत्तरायणमार्गाने जाणाऱ्या अधिकाऱ्याला आपल्या सीमेच्या पलिकडे नेऊन उत्तरायणाच्या अभिमानी देवतेच्या अधीन करणे ह्याचे काम आहे.

ज्या सहा महिन्यात सूर्य उत्तर दिशेकडे जात असतो त्या सहा महिन्याला उत्तरायण म्हणतात. त्या उत्तरायण कालाभिमानी देवतेचा वाचक **'षण्मासा उत्तरायणम्'** आहे. अंतरिक्ष लोकाच्या वर ज्या लोकात सहा महिन्याचा दिवस आणि तितक्याच कालावधीची रात्र असते तेथपर्यंत ह्याचा अधिकार आहे आणि उत्तरायण मार्गाने जाणाऱ्या परमधामच्या अधिकाऱ्याला आपल्या हद्दीतून पलीकडे, उपनिषदात वर्णन केलेल्या (छान्दोग्य-उप० ४ । १५ । ५; ५ । १० । १,२; बृहदारण्यक-उप० ६ । २ । १५) संवत्सराच्या अभिमानी देवतेजवळ पोहचविणे, ह्याचे काम आहे. तेथून पुढील संवत्सराची अभिमानी देवता, त्याला सूर्यलोकात पोहचविते. तेथून क्रमशः आदित्यभिमानी देवता, चन्द्राभिमानी देवतेच्या अधिकारात आणि ती विद्युत अभिमानी देवतेच्या अधिकारात पोहचविते. पुन्हा तेथे परमेश्वराच्या परमधामाहून परमेश्वराचे अमानवी पुरुष (पार्षद) येऊन त्याला परमाधामाला घेऊन जातात तेव्हा त्याचे परमेश्वराशी मिलन होते.

त्या ब्रह्मरूप परमपदाला प्राप्त होऊन तो पुन्हा या संसाराच्या जन्म मरणरूप चक्रात येत नाही. ब्रह्मलोकापर्यंत गेलेला प्राणी पुन्हा या संसारात परतून कर्मानुसार योनीत जन्म घेतो कारण की ब्रह्मा व त्याचा लोक - दोघेही अवधि असणारे असे आहेत -

**आब्रह्मभुवनाल्लोकाः पुनरावर्तिनोऽर्जुन ।**

(गीता ८ । १६ चा पूर्वार्ध)

**सहस्रयुगपर्यन्तमहर्यद् ब्रह्मणो विदुः ।**
**रात्रिं युगसहस्रान्तां तेऽहोरात्रविदो जनाः ।।**

(गीता ८ । १७)

'ब्रह्माचा जो एक दिवस आहे त्याला एक हजार व चतुर्युगापर्यंतचा अवधि असणारा आणि एक हजार चतुर्युगापर्यंतचा अवधि असणाऱ्या रात्रीला जे पुरुष तत्त्वाने जाणतात ते योगी जन काळाचे तत्त्व जाणणारे आहेत.'

चार युगे एकत्रित केल्यावर एक दिव्ययुग तयार होते. कलियुग ४,३२,००० वर्ष, द्वापर ८,६४,००० वर्ष, त्रेता १२,९६,००० वर्ष तसेच सत्ययुग १७,२८,००० वर्ष. याप्रकारे एकूण ४३,२०,००० वर्षांचे एक दिव्ययुग होते. देवतांच्या वेळेचे परिमाण आपल्या वेळेच्या परिमाणाच्या ३६० पट अधिक मानले जाते. एक हजार दिव्ययुगांचा अर्थात आपल्या ४,३२,००,००,००० (चार अब्ज बत्तीस कोटी) वर्षांचा ब्रह्माचा एक दिवस असतो तसेच इतकीच मोठी एक रात्र असते. अशाप्रकारे १०० वर्षे उलटल्यावर आपल्या लोकासहित ब्रह्मादेखील शांत होतो. या विषयाचे विस्तृत वर्णन मनुस्मृतीच्या प्रथम अध्यायात ६४ ते ७३ श्लोकांपर्यंत आहे.

संपूर्ण चराचर प्राणीमात्र ब्रह्माच्या दिवसाच्या प्रवेशकालात अव्यक्तापासून अर्थात ब्रह्माच्या सूक्ष्म शरीरापासून उत्पन्न होतात आणि ब्रह्माच्या रात्रीच्या प्रवेशकालात त्या अव्यक्त नावाच्या ब्रह्माच्या सूक्ष्म शरीरातच लीन होतात.

**अव्यक्ताद् व्यक्तयः सर्वाः प्रभवन्त्यहरागमे ।**
**रात्र्यागमे प्रलीयन्ते तत्रैवाव्यक्तसंज्ञके ।।**

(गीता ८ । १८)

अशाप्रकारे अवधि असणारा होण्यामुळे ब्रह्मा आणि ब्रह्मलोक सुद्धा अवधि पूर्ण झाल्यावर विनष्ट होतात. या सर्वांचा विनाश झाल्यावर सुद्धा सच्चिदानंदघन परमात्म्याचा नाश होत नाही-

**परस्तस्मात्तु भावोऽन्योऽव्यक्तोऽव्यक्तात्सनातनः ।**
**यः स सर्वेषु भूतेषु नश्यत्सु न विनश्यति ।।**

(गीता ८ । २०)

'त्या अव्यक्ताच्याही पलीकडे जो दुसरा अर्थात् विलक्षण असा सनातन अव्यक्तभाव आहे, तो दिव्य पुरुष परमात्मा सर्व प्राणी नष्ट झाल्यानंतर सुद्धा नष्ट होत नाही.'

अखंड अभ्यासाच्या प्रभावामुळे माणसाला या जीवनकालात सुद्धा परमदिव्यपुरुष परमात्म्याची प्राप्ती होते. कारण की निरंतर स्मरण करणाऱ्याला परमेश्वराची प्राप्ती सोपी आहे. भगवान् म्हणतात की -

**अनन्यचेताः सततं यो मां स्मरति नित्यशः ।**
**तस्याहं सुलभः पार्थ नित्ययुक्तस्य योगिनः ।।**

(गीता ८ । १४)

'हे अर्जुना ! जो मनुष्य माझ्यात अनन्यचित्त होऊन नेहमीच मज पुरुषोत्तमाचे स्मरण करीत असतो. त्या नित्य-निरंतर माझ्याशी जोडलेल्या योग्यासाठी मी सुलभ आहे अर्थात् त्याला मी सहज प्राप्त होतो.'

अशाप्रकारे अभ्यास करणाऱ्यांना जेव्हा ह्या जन्मातच परमेश्वर भेटू शकतो, तेव्हा अंतकाळी भेटून जातो - यात सांगायचे ते काय? परमेश्वराला प्रत्येक वेळी आठवणीत ठेवणे हे देखील काही कठीण काम नाही तसेच अशाप्रकारे जो परमात्म्याला प्राप्त होतो, तो पुन्हा या दु:खरूप संसारात परत कधी येत नाही -

**मामुपेत्य पुनर्जन्म दुःखालयमशाश्वतम् ।**
**नाप्नुवन्ति महात्मानः संसिद्धिं परमां गताः ।।**

(गीता ८ । १५)

'परमसिद्धी प्राप्त झालेले महात्मा लोक मला प्राप्त केल्यानंतर दु:खाचे घर म्हणजेच क्षणभंगूर पुनर्जन्माला प्राप्त होत नाहीत.'

तो मनुष्य संपूर्ण जगाचे उल्लंघन करून परमपदरूप परमात्म्याला

नेहमीसाठी आपलेसे करतो.

**वेदेषु यज्ञेषु तपःसु चैव**
**दानेषु यत्पुण्यफलं प्रदिष्टम् ।**
**अत्येति तत्सर्वमिदं विदित्वा**
**योगी परं स्थानमुपैति चाद्यम् ।।**

(गीता ८ । २८)

'योगी मनुष्य या रहस्याचे तत्त्व जाणून वेदपठनात तसेच यज्ञ, तप आणि दान इ. करण्यात जे पुण्यफल सांगितले गेले आहे, त्या सर्वांचे नि:शंकपणे उल्लंघन करतो आणि सनातन परमपदाला प्राप्त होतो.'

गीतेच्या ह्या आठव्या अध्यायात मनुष्याच्या मृत्युसमयी झालेल्या भगवंतांच्या चिंतनाच्या विशेष महत्त्वाचे वर्णन आहे. म्हणून मृत्युच्या वेळी मनुष्याने अर्थासहित हा अध्याय अवश्य ऐकला पाहिजे. जर सर्वच्या सर्व अध्याय न ऐकवला गेला तर वर ज्या श्लोकांचे वर्णन आले आहे, कमीत कमी हे विशिष्ट श्लोक तर अर्थासहित अवश्यच ऐकविले पाहिजेत कारण की मनुष्य या श्लोकांतून एका श्लोकाचा सुद्धा अर्थ आणि भाव समजून धारण करील तर सहजच त्याचे कल्याण होऊ शकते. नंतर असेच सदा-सर्वदा प्रत्येक वेळी भगवंतांच्या सगुण-निर्गुण, साकार-निराकार कोणत्याही स्वरूपाचे जो स्मरण करतो, त्याच्या बाबतीत तर अंतकाळी त्याला भगवंतांची आठवण होणे अगदी सहाजिक आहे.

*****

# परमेश्वरासाठी कर्म आणि परमेश्वराच्या दयेचे रहस्य

सर्व प्राणी, पदार्थ, क्रिया आणि भाव यांचा संबंध परमेश्वराबरोबर जोडून साधन केल्यास साधकाच्या हृदयात उत्साह, समता, प्रसन्नता, शांति आणि परमेश्वराची स्मृती (आठवण) प्रत्येक वेळी होत राहाते. यामुळे भगवंतांच्या ठिकाणी मोठी श्रद्धा - प्रेम निर्माण होऊन भगवंतांची प्राप्ती सहजपणे होऊ शकते. जे काही आहे ते सर्व भगवंतांचे आहे आणि मी देखील भगवंतांचा आहे. भगवंत सर्वांमध्ये भरून राहिले आहेत (गीता १८ । ४६), यासाठी सर्वांची सेवा हीच भगवंतांची सेवा आहे, मी जे काही करत आहे, भगवंतांच्या प्रेरणेनेच भगवंतांसाठीच करत आहे, भगवंतच मला अत्यंत प्रिय आहेत आणि माझे मोठे हित साधणारे आहेत - ह्या प्रकारच्या भावनेने आपले घर किंवा कार्यालयाच्या कामाला अथवा कोणत्याही धार्मिक संस्थेच्या कामाला, आपल्या प्रिय भगवंतांचेच काम समजून आणि स्वत: भगवंतांचेच होऊन काम करण्यामुळे साधकाला कधीही कंटाळा येत नाही, उलट चित्तात धैर्य, उत्साह, प्रसन्नता आणि शांति उत्तरोत्तर वाढत जाते. जर वाढत नसेल तर गंभीरतापूर्वक विचार करावयास पाहिजे की याचे कारण काय असावे? शोध घेतल्यावर लक्षात येईल की श्रद्धा विश्वास कमी आहे, हेच ह्याचे कारण आहे. ही उणीव काढून टाकण्यासाठी साधकाने भगवंताला शरण जाऊन त्यांची करूणापूर्वक स्तुति-प्रार्थना केली पाहिजे आणि भगवंतांचे गुण, प्रभाव, तत्त्व, रहस्य जाणून घेतले पाहिजे.

गीताप्रचाराचे काम तर प्रत्यक्ष परमेश्वराचेच काम आहे; यात मुळीच शंका नाही. जो मनुष्य श्रीमद्भगवद्गीतेचा अर्थ भाव समजून गीतेचा प्रसार करतो, त्यामुळे त्याचा उद्धार होतो आणि भगवंत त्याच्यावर

अधिकच प्रसन्न होतात. यासाठी गीता अध्याय १८ श्लोक ६८-६९ बघावयास पाहिजे -

**य इमं परमं गुह्यं मद्भक्तेष्वभिधास्यति ।**
**भक्तिं मयि परां कृत्वा मामेवैष्यत्यसंशय ।।**
**न च तस्मान्मनुष्येषु कश्चिन्मे प्रियकृत्तमः ।**
**भविता न च मे तस्मादन्यः प्रियतरो भुवि ।।**

'जो मनुष्य माझ्यावर खूप प्रेम करून हे परम रहस्ययुक्त गीताशास्त्र माझ्या भक्तांमध्ये सांगेल तो मलाच प्राप्त करून घेईल यात काहीच शंका नाही. यापेक्षा अधिक माझे प्रिय कार्य करणारा मानवांमध्ये कोणी देखील नाही तसेच संपूर्ण जगात यापेक्षा अधिक मला प्रिय दुसरा कोणी भविष्यात देखील होणार नाही.'

जो मनुष्य ह्या दोन श्लोकांचा अर्थ आणि भाव उत्तम रीतीने जाणतो त्याचे तर सर्व जीवन गीता प्रचारातच व्यतीत व्हावयास पाहिजे. वर्तमान काळात जो काही गीतेचा प्रचार आमच्या पाहाण्यात - ऐकण्यात येतो त्याचे सुद्धा प्रमुख कारण या दोन श्लोकांचा अर्थ आणि भाव जाणण्याचाच प्रभाव आहे.

म्हणूनच गीता प्रचाराचे कार्य परमेश्वराचेच कार्य आहे आणि हे भगवंतांच्या विशेष कृपेनेच प्राप्त होते. पैसे खर्च करून हे मिळत नाही.

भगवंतांचे काम करणे - त्यांच्या आज्ञेचे पालन करणे ही भगवंतांचीच सेवा आहे. प्रत्यक्षात ह्या कामाला भगवंतांची सेवा समजून करण्यानेच प्रसन्नता किंवा शांती अवश्य प्राप्त होऊ शकते. जर मिळत नसेल तर त्याने ह्या कामाला भगवंतांची सेवा आहे असे जाणले नाही. जर कोणी मनुष्य महात्म्याला महात्मा समजून त्याच्या कार्याला, त्याच्या आज्ञापालनाला त्याची सेवा समजून काम करतो तेव्हा त्याच्या अंतःकरणात इतका आनंद निर्माण होतो की तो स्वतःत मावत नाही, तर मग भगवंतांच्या सेवेमुळे परमप्रसन्नता आणि शांती मिळते यात सांगायचे ते काय ?

गीताप्रचाराचे कार्य करणाऱ्यांच्या मनात जर भगवंतांची स्मृती प्रसन्नता, उत्साह, प्रेम आणि शांती नसेल तर त्याने ह्याचे कारण शोधले पाहिजे, अशाप्रकारे जो दोष लक्षात आला, तो भगवंतांच्या दयेचा आश्रय घेऊन दूर केला पाहिजे. भगवंतांची दया सर्वांवर अपार आहे, ती पूर्णपणे न समजल्यामुळेच आम्ही लोक प्रसन्नता व शांती मिळण्यापासून वञ्चित राहातो. आम्हा लोकांवर भगवंतांची जी अपार, पूर्ण दया आहे, तिच्या शतांशही आम्ही त्याला समजू शकत नाही. परंतु लक्षात न आल्यावर देखील आपण आपल्यावर भगवंतांची अपार दया आहे असे मानत राहिले पाहिजे. असे केल्यावर ती पुढे वाढत जाऊन आपल्या लक्षात येऊ शकते.

दयेच्या या तत्त्वाला उत्तमरीतीने समजण्यासाठी येथे एक दृष्टांत सांगितला जातो. तो अशा प्रकारचा आहे की - एक क्षत्रिय मुलगा राजाच्या मदतीने व व्यवस्थेमुळे महाविद्यालयात शिकत होता. त्याचे आई वडील नेहमी त्याला हाच उपदेश करीत असत की, 'या देशाचा राजा उच्चकोटीचा, ज्ञानी योगी महापुरुष आहे, तो निरिच्छ प्रेमळ व दयाळू आहे, त्याची आपणा सर्वांवर मोठी दया आहे. आमचा मृत्यु झाल्यावर तू काळजी करू नकोस; कारण की महाराजांची दया तुझ्यावर आमच्या दयेपेक्षाही खूप अधिक आहे.' आई वडीलांच्या या उपदेशानुसार तो असेच मानीत होता. कालांतराने त्याचे आई-वडील मरण पावले, तथापि तो मुलगा दुःखी झाला नाही. विद्यालयातील सहाध्यायी मुलांनी त्याला विचारले - 'तुझे आई-वडील मरण पावले तरी देखील तुझ्या चेहऱ्यावर दुःख नाही हे कसे? आता तुझे पालन -पोषण कोण करणार?' क्षत्रिय मुलाने सांगितले, 'मला दुःख कसे होईल? कारण की माझ्या आई-वडीलांपेक्षाही अधिक दया-प्रेम करणारे आमचे परमहितकारी महाराज आहेत. महाराज उच्चकोटीचे भक्त तसेच ज्ञानी महापुरुष आहेत. मी तर त्यांच्यावरच अवलंबून आहे. मुलाची ही गोष्ट ऐकून तेथील मुख्याध्यापकांना खूप आश्चर्य वाटले की,

पहा या मुलाच्या अंत:करणात महाराजांविषयी किती श्रद्धा - भक्ती आहे! ते मुख्याध्यापक राज्याच्या कौंसिलचे सदस्य होते. एके दिवशी जेव्हा कौंसिलची बैठक झाली तेव्हा ते देखील तेथे उपस्थित होते. त्या दिवशी महाराजांनी सांगितले की - 'आपल्या देशात कोणी अनाथ मुलगा असेल तर सांगा त्याचा प्रबंध राज्याकडून अतिशय उत्तमरीतीने होणे योग्य आहे.' कौंसिलातील काही सदस्यांनी त्याच क्षत्रिय मुलाचे नाव सुचविले, यावर राजाने सर्वांच्या संमतीने त्या मुलाच्या खाण्या-पिण्याची सर्व व्यवस्था केली आणि त्याच्या कच्च्या घराचे पक्के घर करून देण्याचा हुकूम दिला. शिकण्याची व्यवस्था तर पूर्वीपासून राज्याच्या वतीनेच होती.

थोड्याच दिवसांनंतर जेव्हा राजाच्या आज्ञेने राज कर्मचारी त्याचे कच्चे घर पक्के बनविण्यासाठी पाडत होते. तेव्हा त्या क्षत्रिय बालकाच्या एका सहाध्यायाने पळत जाऊन सूचना दिली की तुमचे घर राजकर्मचारी तोडून बरबाद करीत आहेत; हे एकून तो मुलगा एकदम खुष झाला आणि म्हणू लागला - 'अहा ! महाराजांची माझ्यावर मोठीच दया आहे. कदाचित जुने घर पाडून नवीन पक्के घर बनवून देतील !' त्याचे हे बोलणे ऐकून मुख्याध्यापक आश्चर्यचकित झाले व विचार करू लागले की, 'पहा ह्या मुलाचा किती दृढ विश्वास आहे. महाराजांवर किती अतूट श्रद्धा आहे.'

पुन्हा जेव्हा दुसऱ्यावेळी बार कौंसिलच्या बैठकीत मुख्याध्यापक उपस्थित झाले तेव्हा राजाने हा प्रस्ताव मांडला - 'मी वृद्ध झालो आहे. मला मूलबाळ नाही. तेव्हा मी युवराजपद कोणाला देऊ? त्यासाठी योग्य कोण आहे?' यावर मुख्याध्यापकाने सांगितले - 'तो क्षत्रिय मुलगा गुण, आचरण, विद्या आणि स्वभावाने सर्वांमध्ये चांगला आहे. तो राजभक्त आहे आणि आपल्यावर तर त्याची अपार श्रद्धा आहे.' या गोष्टीचे इतर सदस्यांनी देखील प्रसन्नतापूर्वक समर्थन केले. राजाने सर्वांच्या संमतीने त्या क्षत्रिय मुलालाच युवराजपद दिले.

दुसऱ्या दिवशी राजाचे मंत्री आणि काही उच्च पदाधिकारी त्या क्षत्रिय मुलाच्या घरी गेले. त्या सर्वांना येत असलेले पाहून त्या क्षत्रिय मुलाने त्यांचा अतिशय आदर - सत्कार केला आणि म्हणाला, 'मी आपली काय सेवा करू?' पदाधिकाऱ्यांनी सांगितले - 'महाराजांची आपल्यावर फार मोठी दया आहे.' 'महाराजांची माझ्यावर अपार दया आहे हे मी पूर्वी पासूनच जाणत आहे. याच कारणामुळे तुम्हा लोकांची देखील माझ्यावर फार मोठी दया आहे - ही गोष्ट मला चांगली माहित आहे.' पदाधिकारी म्हणाले, 'आम्ही तर आपले सेवक आहोत आपली दया इच्छितो.' मुलगा म्हणाला, 'आपण असे बोलून मला लज्जित करू नका मी तर आपला सेवक आहे. महाराजांची माझ्यावर दया आहे हे मी चांगलेच जाणतो.' पदाधिकारी म्हणाले - 'आपण जे काही जाणता आहात त्यापेक्षा कितीतरी अधिक त्यांची दया आहे.' क्षत्रिय मुलाने विचारले, 'महाराजांनी माझ्या विवाहाची व्यवस्था केली आहे काय?' तेव्हा ते म्हणाले, 'विवाहाची व्यवस्थाच नाही तर महाराजांची आपल्यावर अतिशय दया आहे.' मुलाने पुन्हा विचारले. 'महाराजांनी मला दोन-चार गावांची जहागिरदारी दिली आहे का?' पदाधिकारी म्हणाले, 'हे तर काहीच नाही त्यांची जी आपल्यावर दया आहे त्याची आपण कल्पनासुद्धा करू शकत नाही.' यावर त्या मुलाने निवेदन केले की - 'त्यांची माझ्यावर कशी दया आहे हे आपणच कृपा करून सांगावे.' त्यांनी सांगितले, 'आपल्याला महाराजांनी युवराजपद दिलेले आहे. यासाठी आम्ही आपली दया इच्छितो.' हे ऐकून तो क्षत्रिय मुलगा आनंदाने इतका बेहोश झाला की त्यालाच त्याचे भान राहिले नाही.

या दृष्टान्ताकडे अधात्मविषयात अशा रीतीने पाहिले पाहिजे की भगवंतच ज्ञानी महापुरुष आहेत. श्रद्धाळू साधकच क्षत्रिय मुलगा आहे. उपदेश देणारे गुरुजनच माता-पिता आहेत. सत्संगी साधक गण हेच सहाध्यायी मुले आहेत. भगवंतप्रेमी महापुरुषच कौंसिलचे सदस्य

मुख्याध्यापक आहेत, राज्याकडून मुलाच्या खाण्यापिण्याची व्यवस्था केली जाणे हे लोकांच्या दृष्टीने अनुकूल परिस्थितीची प्राप्ती आणि घर पाडण्यास लोकांच्या दृष्टीने प्रतिकूल परिस्थितीची प्राप्ती समजावयास पाहिजे. तसेच या दोहोत मुलाच्या द्वारे राजाचे मङ्गलविधान मानून प्रसन्न होण्याच्या प्रत्येक घटनेत परमेश्वराचे मंगलमय विधान समजून प्रसन्न होणे समजले पाहिजे. मुलाचे राजाला सुहृद समजून त्याच्यावरील निर्भरता, श्रद्धा आणि विश्वास करणे हेच परमेश्वर शरणागतीचे साधन समजले पाहिजे.

ह्या दृष्टांतापासून आपण सर्वांनी ही गोष्ट शिकली पाहिजे की आपण आपल्यावर परमेश्वराची जेवढी दया आहे असे मानतो, परमेश्वराची दया त्यापेक्षा कितीतरी अधिक आहे. परमेश्वराची आमच्यावर एवढी दया आहे की त्याची आपण कल्पना देखील करू शकत नाही. जर आपल्याला त्याच्या दयेची जाण झाली तर क्षत्रिय मुलाप्रमाणे आपल्याला एवढा आनंद होईल व प्रसन्नता येईल की त्याला सीमाही राहाणार नाही; पुन्हा आपल्याला आपले भान सुद्धा राहाणार नाही.

म्हणून आपल्याला स्वेच्छा, अनिच्छा किंवा परेच्छा यापासून जे काही प्राप्त होईल त्याला परमेश्वराचे दयापूर्ण मङ्गलमय विधान समजून आणि आपल्याद्वारा होणाऱ्या क्रियांना परमेश्वराचे काम किंवा परमेश्वराची परमसेवा समजून प्रत्येकवेळी परमेश्वराची आठवण ठेवताना आनंदात मग्न राहिले पाहिजे.

अशाप्रकारे परमेश्वर भक्तीच्या साधनाने साधकाच्या ठिकाणी मनात प्रसन्नता, रोमाञ्च आणि अश्रुपात होऊ लागतो. हृदय प्रफुल्लित होते वाणी गद्‌गद् होते तसेच कण्ठ दाटून येतो परंतु मनुष्य जेव्हा साधन करता करता सिद्धावस्थेत पोहोचतो - परमेश्वराला प्राप्त करतो तेव्हा आमोद, प्रमोद, हर्ष इत्यादींनी वर जाऊन परम शांती, परम आनंद प्राप्त करून घेतो. ज्याप्रमाणे कढईत तूप टाकून त्यात कचोरी तळली जाते. ती जोपर्यंत कच्ची असते तोपर्यंत ती उसळत असते - तिच्यात विशेष

क्रिया होत असते. परंतु जेव्हा ती तळत राहाते तेव्हा तिचे उसळणे कमी होते व सर्व बाजूंनी पक्की झाल्यावर ती शांत व स्थिर होते याचप्रमाणे साधन करतेवेळी साधकात जोपर्यंत अपीरपक्वता असते तोपर्यंत तो साधन - विषयात, आमोद - प्रमोदात उसळत असतो. इतकेच नव्हे तर रोमाञ्च, अश्रुपात आणि कण्ठ दाटून येत असतो परंतु जेव्हा साधन पक्के होत जाते तेव्हा हर्ष इ. विकारांचे उधाण कमी होत जाते आणि पूर्णपणे पक्व झाल्यावर तो आमोद - प्रमोद हर्ष इ. विकाररहित असा परम शांत होतो. मग तो परमात्म्यात अचल आणि स्थिर होऊन परमशांती आणि परमानंद स्वरूप परमात्म्याला प्राप्त होतो.

*****

# अखंड भगवच्चिंतनाचे महात्म्य

भगवंतांच्या साकार-निराकार, सगुण-निर्गुण कोणत्याही स्वरूपाचे निरंतर स्मरण करण्यासारखे कोणतेही साधन नाही. हे साधन फारच सोपे आहे. या साधनामुळे भगवत्प्राप्ती ताबडतोब होते. जर ह्या मनुष्यजन्मात भगवत्प्राप्ती झाली नाही तर फार मोठे नुकसान आहे. फार मोठ्या भयाची गोष्ट आहे. श्रुती असे म्हणते की -

**इह चेदवेदीदथ सत्यमस्ति न चेदिहावेदीन्महती विनष्टिः ।**

(केन० २ । ५)

'जर या मनुष्य-जन्मात परमेश्वराला जाणले तर ठीक आहे आणि जर त्याला या जन्मात नाही जाणले तर फार मोठे नुकसान आहे.'

कारण की मनुष्य भगवंतांशिवाय कोणत्याही प्राण्याचे किंवा पदार्थाचे चिंतन करीत मरतो त्याला दुर्गती मिळते. मृत्युसमयी तो ज्या मनुष्य, पितर, देवता, पशू, पक्षी, कीटक, पतंग इ. चे चिंतन करीत मरतो, त्याला तेच प्राप्त होते. गीतेत भगवंतांनी सांगितले आहे की -

**यं यं वापि स्मरन्भावं त्यजत्यन्ते कलेवरम् ।**
**तं तमेवैति कौन्तेय सदा तद्भावभावितः ।।**

(८ । ६)

'हे कुन्तीपुत्र अर्जुना ! हा मनुष्य अंतकाळी ज्या कोणत्या भावाचे स्मरण करीत असताना शरीर सोडतो तेच त्याला प्राप्त होते. कारण की तो नेहमी त्या भावातच मग्न असतो.'

आपल्याला हे माहित नाही की आपला मृत्यु केव्हा होणार आहे. कारण मृत्यु ही गोष्ट अचानक घडणारी आहे. या करिता आम्ही प्रत्येकवेळी भगवंतांची आठवण करीतच सर्व कामे केली पाहिजेत. भगवंताने गीतेत अर्जुनाला सांगितले आहे -

**तस्मात्सर्वेषु कालेषु मामनुस्मर युध्य च ।**
**मय्यर्पितमनोबुद्धिर्मामेवैष्यस्यसंशयम् ।।**

(८ । ७)

'यासाठी हे अर्जुना ! तू सर्व वेळी माझे स्मरण कर आणि युद्ध देखील कर. याप्रकारे माझ्यात अर्पण केलेल्या मन-बुद्धीने युक्त होऊन तू निःसंदेह मलाच प्राप्त होशील.'

जर आम्ही प्रत्येकवेळी भगवंतांचे स्मरण करत राहिलो तर आम्ही अवश्यच भगवंतांना प्राप्त होऊ. म्हणूनच एक क्षण देखील भगवंतांना विसरता कामा नये.

शरीर आणि इंद्रियांनी आपण जे काही करत आहात तेच करत राहा परंतु मनाने भगवंतांशिवाय दुसऱ्या कोणाचे देखील चिंतन करू नका. असे तर मनुष्य स्वाभाविकच दोन कामे एकाच वेळी करत असतो. जसे शौच-स्नान, खान-पान इ. ची क्रिया इंद्रियांनी होते आणि मन दुसरेच व्यर्थ चिंतन करत असते. परंतु आमची अशी विनंती आहे की आपण जसे शौच-स्नान इ. क्रिया तसेच उपजीविकेसाठी व्यापार इ. क्रिया - शरीर तसेच बोलणे इ. इंद्रियाद्वारा करत आलो आहोत, वाटल्यास तसेच करत राहा; परंतु भगवंतांना मात्र कधीही विसरू नका. प्रपंचात कधी काही कमी झाले किंवा दोष निर्माण झाला तर भगवंतांच्या अखंड स्मृतीच्या प्रभावामुळे तो भरून निघतो; कारण की कसा ही पापी जरी असला तरी भगवंतांच्या अनन्य भक्तीमुळे त्याच्यात सुधारणा होऊन त्याचा उद्धार होतो. भगवंत अर्जुनाला म्हणतात -

**अपि चेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक् ।**
**साधुरेव स मन्तव्यः सम्यग्व्यवसितो हि सः ।।**
**क्षिप्रं भवति धर्मात्मा शश्वच्छान्तिं निगच्छति ।**
**कौन्तेय प्रति जानीहि न मे भक्तः प्रणश्यति ।।**

(गीता ९ । ३० - ३१)

'जरी एखादा मनुष्य अतिशय दुराचारी असला तरी तो जर अनन्यभावाने माझा भक्त होऊन माझी भक्ती करीत असेल तर तो साधूच मानणे योग्य आहे कारण की तो यथार्थ निश्चयी आहे. अर्थात त्याने उत्तम निश्चय केला आहे की भगवंतांची भक्ती करण्यासारखे दुसरे काहीही नाही.'

'तो ताबडतोब धर्मात्मा होतो आणि सदैव अशा परमशांतीला प्राप्त होतो. हे अर्जुना ! तू निश्चितपणे हे सत्य जाण की माझ्या भक्ताचा विनाश होत नाही.'

यावरून हे लक्षात घेतले पाहिजे की दोषांचा नाश तर भगवंतांच्या अनन्य-भक्तीच्या प्रभावाने विनाकष्ट होऊ शकतो परंतु अनन्य-भक्तीत उणीव राहिली तर मात्र फार मोठी हानी आहे कारण की त्याची पूर्तता आपोआप होत नाही.

म्हणूनच ज्या कार्याकरिता आम्हाला हे मनुष्य शरीर मिळाले आहे त्याच कार्यासाठी त्याला लावले पाहिजे. परमेश्वराने आम्हाला विवेक, बुद्धी, विचार आणि ज्ञान दिले आहे त्याचे सार्थक केले पाहिजे तसेच ह्या मोहनिद्रेतून जागे होऊन महापुरुषांच्या जवळ जावयास पाहिजे त्याचप्रमाणे त्यांच्याकडून त्याला जाणण्यायोग्य परमात्म्याच्या तत्त्वाला जोडून आपले कल्याण करून घेतले पाहिजे. कठोपनिषदात सांगितले आहे की -

**उत्तिष्ठत जाग्रत प्राप्य वरान्निबोधत ।**

(१ । ३ । १४)

'उठा, जागे व्हा आणि श्रेष्ठ पुरुषांकडे जाऊन त्यांच्याकडून जाणण्यास योग्य असे परमात्म-तत्त्व समजून घ्या.'

म्हणून मनुष्य शरीर असतानाच परमात्मा प्राप्त होण्याच्या कार्य सिद्धीसाठी विशेष प्रयत्न केला पाहिजे. भगवंतांनी सांगितले आहे की,

**अनित्यमसुखं लोकमिमं प्राप्य भजस्व माम् ।।**

(गीता ९ । ३३ चा उत्तरार्ध)

'हे अर्जुना ! तू हे सुखरहित आणि क्षणभंगूर, दुर्लभ असे मनुष्य शरीर प्राप्त करून अखण्ड माझेच स्मरण कर.'

जर भगवंतांच्या अखंड चिंतनाचा प्रयत्न करत असताना मृत्यु आला तरी देखील कल्याणच आहे. परंतु भगवच्चिंतनाखेरीज मृत्यु आल्यानंतर पश्चात्ताप करण्याने कोणतेही काम सफल होत नाही.

म्हणून शरीर जिवंत असतानाच आपले कार्य सफल केले पाहिजे. नाहीतर आग लागल्यावर विहीर खणण्याने कोणतेही कार्य सफल होत नाही.

श्रीभर्तुहरीने सांगितले आहे की -

**यावत्स्वस्थमिदं कलेवरगृहं यावच्च दूरे जरा**
**यावच्चेन्द्रियशक्तिरप्रतिहता यावत्क्षयो नायुषः ।**
**आत्मश्रेयसि तावदेव विदुषा कार्यः प्रयत्नो महान्**
**प्रोद्दीप्ते भवने च कूपखननं प्रत्युद्यमः कीदृशः ।।**

(वैराग्यशतक ८६)

'जोपर्यंत हे शरीररूपी घर ठीक आहे, जोपर्यंत वृद्धावस्था दूर आहे, जोपर्यंत इंद्रियांची शक्ती क्षीण झालेली नाही तोपर्यंत सुज्ञ माणसाने स्वतःच्या कल्याणाकरिता खूप प्रयत्न करावयास पाहिजे नाहीतर घराला आग लागल्यावर विहीर खणण्याचा प्रयत्न केल्याने काय होईल?

भोजराजा सांगतो की -

**चेतोहरा युवतयः सुहृदोऽनुकूलाः**
**सद्बान्धवाः प्रणयगर्भगिरश्च भृत्याः ।**
**गर्जन्ति दन्तिनिवहास्तरलास्तुरङ्गाः**
**सम्मीलने नयनयोर्न हि किंचिदस्ति ।।**

'मन मोहून टाकणाऱ्या स्त्रिया आहेत, मित्र सुद्धा अनुकूल आहेत, नातेवाईक देखील अतिशय चांगले आहेत, सेवकही प्रेमाने बोलणारे आहेत, कितीतरी तरी हत्ती चीत्कार करत आहेत, तेजस्वी घोडे

खिंकाळत आहेत तथापि डोळे मिटल्यानंतर त्याच्यासाठी काहीही राहत नसते.'

श्रीतुलसीदासजी सांगतात की,

**झूमत द्वार अनेक मतंग जँजीर-जुरे, मद-अंबु चुचाते ।**
**तीखे तुरंग मनोगति चंचल पौनके गौनहु तें बढ़ि जाते ।।**
**भीतर चन्द्रमुखी अवलोकति, बाहर भूप खरे न समाते ।**
**ऐसे भए तौ कहा तुलसी जो पै जानकीनाथके रंग न राते ।।**

(कविता० उत्तर० ४४)

मन अतिशय चंचल, प्रमादी आणि मूर्ख देखील आहे. ज्याप्रमाणे मुलगा विद्याभ्यास सोडून खेळण्यासाठी निघून जातो; कारण त्याला खेळण्यात अधिक रस आहे; परंतु तो जेव्हा मोठा होतो, त्याला समज येते तेव्हा तो पश्चात्ताप करतो की बालपणी मी खेळण्या-दवडण्यात वेळ घालविला, विद्याभ्यास केला नाही, हा माझा फार मोठा मूर्खपणा झाला. तथापि या पश्चात्तापामुळे कोणतेही कार्य सफल होत नाही. त्याचप्रमाणे जो मनुष्य परमेश्वराचे अखंड चिन्तन न करता विषयभोगांत, व्यर्थ कामांत आणि पापकार्यात रस घेतो त्याला देखील फार मोठा पश्चात्ताप करावा लागेल. गोस्वामी तुलसीदासजींनी सांगितले आहे की -

**सो परत्र दुख पावइ सिर धुनि धुनि पछिताइ ।**
**कालहि कर्महि ईस्वरहि मिथ्या दोस लगाइ ।।**

(रा० च० मा०, उत्तर० ४३)

श्रीसुन्दरदासजी देखील म्हणतात -

**तू कछु और बिचारत है नर तेरो बिचार धर्‌यौ ही रहैगो ।**
**कोटि उपाय करै धनकै हित भाग लिख्यौ तितनो ही लहैगो ।।**
**भोर कि साँझ घरी पल माझ सु काल अचानक आइ गहैगो ।**
**राम भज्यौ न कियौ कछु सुकृत सुंदर यों पछिताइ कहैगो ।।**

(सुन्दर-विलास अंग ३ पद ७)

आपण थोडा विचार करून पाहिला तर मनाने भगवंतांचे नाम,

रूप, गुण, प्रभाव यांचे चिंतन करणे तसेच शास्त्र सत्संगती या द्वारा भक्ति-ज्ञान, वैराग्य-सदाचार इत्यादी अध्यात्मविषयाचे पठन, श्रवण आणि मनन करणे इ. सात्विक कार्यरूप परमार्थात आपला फारच थोडा वेळ जातो असे दिसेल, परंतु आपल्या वेळेचा काही भाग तर आवड-छंद, ऐशाराम, भोग-विलास, मान-मरातब, प्रतिष्ठा इ. राजस कार्यरूप स्वार्थात जाताना दिसेल तसेच बराचसा वेळ मूर्खपणामुळे झोपेत, आळस, चुका आणि पाप इ. तामसी कामे करण्यात व्यर्थ जाताना दिसेल. यासाठी भगवंतांनी आपल्याला जी बुद्धी, विवेक आणि ज्ञान दिले आहे त्यांच्याद्वारा मनाला समजविले पाहिजे. तसेच त्याला राजस तामस रूपी स्वार्थ आणि अनर्थ यापासून दूर करून श्रद्धा-भक्तिपूर्वक निष्काम भावाने निरंतर भगवंतांचे चिंतनरूप परमार्थात लावले पाहिजे. अशाप्रकारे मनाला परमार्थात लावणे हा त्याचा सदुपयोग आहे आणि त्याला विपरीत कामाला लावणे हा त्याचा दुरुपयोग आहे. मनाचा स्वभाव खूपच खालच्या दर्जाचा आहे. भगवंतांचा आश्रय घेऊन अतिशय तत्परतेने प्रयत्न करण्यानेच भगवंत्कृपेने त्याच्यात सुधारणा होऊ शकते.

यावेळी आपल्याला सर्व प्रकारची सुविधा प्राप्त आहे. अध्यात्म-विषयाच्या उन्नतीसाठी भारतवर्ष हा उत्तम देश आहे. तसेच ज्यामध्ये अल्पावधीत केलेल्या साधनेनेच ताबडतोब कार्यसिद्धी होते - असा हा उत्तम कलिकाल आहे. अशा उत्तम देशकालात भगवंतांनी कृपा करून आपल्याला मनुष्यशरीर दिले आहे आणि भजन-ध्यान करण्यासाठी मन, बुद्धी आणि इन्द्रिये दिली आहेत अशा वेळी अध्यात्मविषयक पुस्तकेदेखील कमी किमतीत मिळतात. उत्तम पुरुषांचा सहवास देखील मिळू शकतो. धर्माच्या निष्काम, भावपूर्वक थोड्याशा अनुष्ठानानेही कल्याण प्राप्त होते. या सर्व गोष्टी प्राप्त करून देखील जर आम्ही परमेश्वरप्राप्तीपासून वञ्चित राहिलो तर आमच्या दृष्टीने ही खूपच लज्जेची, दुःखाची व शोकाचीही गोष्ट आहे.

**जो न तरै भव सागर नर समाज अस पाइ ।**
**सो कृत निंदक मंदमति आत्माहन गति जाइ ।।**

(रा० च० मा०, उत्तर० ४४)

म्हणून आपण सर्वांनी विचार करावयास हवा आणि पतनकारक काम, क्रोध, लोभ, मोह, भय, दर्प, ईर्ष्या, द्वेष, ममता, आसक्ती आणि अज्ञानाच्या आहारी जाऊन एक क्षणभर देखील सुहृद भगवंतांना विसरता कामा नये. वैराग्ययुक्त भावाने त्रिलोकीचे वैभव ठोकरून फक्त एका भगवंतांचेच प्रेमपूर्वक निरंतर चिंतन करावयास हवे. आपल्या दृष्टीने यासारखे आणखी कोणतेही अति उपयुक्त असे दुसरे कार्य नाही. तेव्हा आपण दुसऱ्या कामासाठी एक क्षण का होईना का लावावा? यासाठी चालताना-फिरताना, उठता-बसता, खाता-पिता, झोपता-जागताना प्रत्येकवेळी भगवंताचे स्मरण ठेवण्याचा प्रयत्न प्राण जाईपर्यंत प्रयत्न करत राहावा तसेच जप-ध्यान, संध्या-गायत्री, पूजा-पाठ, स्तुति-प्रार्थना करण्याच्या वेळी तर त्याचे अर्थ आणि भाव चांगल्याप्रकारे जाणून श्रद्धा-विश्वास आणि प्रेमपूर्वक निष्कामवृत्तीने गुण आणि प्रभावयुक्त भगवंतांच्या स्वरूपाचे मनापासून अखण्ड चिंतन विशेष प्रकारे करावयास हवे. रात्री देखील झोपण्याच्या वेळी विशेष प्रकारे परमेश्वराला आठवूनच झोपले पाहिजे. यामुळे आपला रात्रीचा झोपेचा वेळ देखील साधनकालाच्या रूपात बदलू शकतो. कारण की मनुष्य १८ तास ज्या कामाचा अभ्यास करतो, रात्री ६ तासात स्वप्न-सुषुप्तीचा वेळ देखील त्यातच जातो. म्हणून लाखो कामे सोडून हेच काम करावे की भगवंतांना कधीच विसरू नये. भगवंतांच्या निरंतर स्मृतीच्या प्रभावाने दुर्गुण-दुराचार, दुर्व्यसन, निद्रा, आळशीपणा, प्रमाद इ. दोषांचा आणि संपूर्ण दुःखांचा सर्वथा नाश होऊन भगवत्प्राप्तीरूप फार मोठी शांती आणि परमानंदाची प्राप्ती ताबडतोबच होऊ शकते -

श्रीभागवतकार म्हणतात -

**अविस्मृतिः कृष्णपदारविन्दयोः**

**क्षिणोत्यभद्राणि शमं तनोति च ।**
**सत्त्वस्य शुद्धिं परमात्मभक्तिं**
**ज्ञानं च विज्ञानविरागयुक्तम् ।।**

(१२ । १२ । ५४)

'भगवान श्रीकृष्णाच्या चरणकमलांची अविचल स्मृती सारे पाप-ताप आणि अमंगल नष्ट करते आणि फार मोठी शांती पसरविते. त्यामुळे अंत:करणाची शुद्धी, परमेश्वराची भक्ती तसेच विज्ञान-वैराग्याने युक्त (परमेश्वराच्या स्वरूपाचे यथार्थ) ज्ञान प्राप्त होऊ शकते.'

**तस्मात् सर्वात्मना राजन् हरिः सर्वत्र सर्वदा ।**
**श्रोतव्यः कीर्तितव्यश्च स्मर्तव्यो भगवान् नृणाम् ।।**

(२ । २ । ३६)

'यासाठी हे परीक्षित राजा ! सर्व माणसांनी, सर्व वेळ, सर्व प्रकारच्या परिस्थितीत सर्व प्रकारांनी भगवान् श्रीहरिचेच श्रवण कीर्तन आणि स्मरण केले पाहिजे.'

*****

# परमेश्वर आणि संतांचा प्रभाव

संपूर्ण बल, ऐश्वर्य, तेज, शक्ती आणि सामर्थ्य संपन्न असलेल्या, अशक्यसुद्धा शक्य करून दाखविणाऱ्या परमेश्वराचा प्रभाव अपरिमित आहे. वास्तविक परमेश्वराच्या स्वरूप आणि प्रभावाचे वर्णन वाणीद्वारा केले जाऊ शकत नाही. ज्या माणसाला परमेश्वराचा यथार्थ अनुभव येतो, तोच त्याला जाणू शकतो. वाणीने तर तो देखील सांगू शकत नाही. यासंबंधी एक दृष्टान्त आहे. आपण असे समजू की मृत्युलोकीचा एक मनुष्य पृथ्वीच्या आत इतक्या खाली पाताळात गेला की जेथे सूर्य, चंद्र, नक्षत्रे यांचे कधीही दर्शन होत नाही. यामुळे तेथे घनदाट अंधकारच अंधकार असतो. तेथे गेल्यावर जेव्हा काही काळ उलटला तेव्हा तेथील लोकांना त्याने विचारले की, 'येथे दिवस नसतो का?' त्या लोकांनी विचारले की, 'दिवस म्हणजे काय?' त्याने सांगितले, 'सूर्य उगवल्यामुळे जो खूप मोठा प्रकाश पडतो त्याला दिवस म्हणतात.' त्यांनी विचारले 'सूर्य म्हणजे काय?' त्याने सांगितले - 'आकाशात प्रकाशाचा मोठा पुंजरूप गोलाकार पिंडाप्रमाणे असा उदयाला येतो तो सूर्य होय.' तेव्हा तेथील लोकांनी हजारो वॅटचा एक बल्ब आकाशात टांगून ठेवला आणि तो पेटवून विचारले - 'सूर्य असाच असतो?' तो माणूस म्हणाला 'हा सूर्याच्या तुलनेत काहीच नाही.' तेथील रहिवाश्यांनी सांगितले - 'याहून अधिक प्रकाश असूच शकत नाही.' तो म्हणाला - 'आपण आपल्या एखाद्या व्यक्तीला माझ्याबरोबर पाठवले तर मी त्याला प्रत्यक्ष दाखवू शकेन.' यावर त्यांनी तेथील एका व्यक्तीला त्याच्याबरोबर पाठविले. तो मनुष्य त्या पाताळ लोकातील व्यक्तिबरोबर मनुष्य लोकात आला, त्यावेळी अमावस्येच्या मध्यरात्रीच्या घोर अंधाराने आकाश व्यापलेले होते तेव्हा सुद्धा येथे त्या लोकापेक्षा

अधिक प्रकाश होता. ते पाहून त्या व्यक्तीने विचारले - 'हाच दिवस आहे का?' त्या माणसाने उत्तर दिले - 'ही तर भयंकर रात्र आहे.' त्यावेळी आकाशात जे तारे चमकत होते, त्यांच्याविषयी त्या पातालवासी व्यक्तीने विचारले, 'हे काय आहे?' त्या माणसाने म्हटले - 'हे तारे आहेत.' अरुणोदय झाल्यावर जेव्हा तारकांचा प्रकाश क्षीण झाला आणि व्यापक असा प्रकाश दिसू लागला त्यावेळी त्याने विचारले - 'हा दिवस आहे?' त्या माणसाने उत्तर दिले - 'नाही, ही तर प्रभात आहे, अरुणोदय आहे. जेव्हा दोन तासांनंतर सूर्योदय होईल त्याला दिवस असे म्हटले जाईल.' त्या व्यक्तीने विचारले - 'आकाशात जे तारे चमकत होते त्यांचे तेज कमी कसे झाले?' त्या माणसाने उत्तर देताना म्हटले - 'सूर्याचा आभास येथे होऊ लागल्यामुळे तारकांचा प्रकाश क्षीण झाला. जेव्हा सूर्योदय होईल तेव्हा त्याच्या प्रखर प्रकाशात हे तारे आकाशात जसे आहेत तसे असून सुद्धा दिसणार नाहीत.' त्यानंतर जेव्हा सूर्योदय होण्याची वेळ जवळ आली त्यावेळी शुक्र आणि गुरु देखील दिसेनासे झाले. जी व्यक्ती पाताळलोकातून आली होती ती सूर्याला पाहू शकली नाही. त्यावेळी जेव्हा अभ्रकावर दिव्याची काजळी धरून सूर्यग्रहणाच्या वेळी जसे सूर्याकडे पाहिले जाते त्याप्रमाणे त्याने पाहिले. सूर्य, दिवस आणि रात्र यांचे त्याने चांगल्याप्रकारे ज्ञान करून घेतले. नंतर तो मनुष्य त्या व्यक्तीला घेऊन पुन्हा त्या लोकात गेला. तेथील रहिवाशांनी त्या व्यक्तीला विचारले - 'तू सूर्याचे स्वरूप प्रत्यक्ष पाहिलेस? दिवस आणि रात्र प्रत्यक्ष पाहिल्यास?' ती व्यक्ती म्हणाली, 'होय मी प्रत्यक्ष पाहिले आहे.' त्यांनी विचारले - 'आता तुम्ही आपल्या भाषेत आम्हाला व्यवस्थित समजावून सांगा.' त्याने उत्तर दिले - 'ही माझ्या शक्तिपलीकडची गोष्ट आहे. मी कोणत्याही प्रकारे समजावून सांगू शकत नाही. आपल्याला समजावून घ्यायचे असेल तर तेथे जाऊनच समजावून घ्यावे; आणखी दुसरा कोणताही उपाय यावर नाही.'

आता ह्या दृष्टांतावर आपण विचार करायला पाहिजे. जेव्हा (सूर्याला) प्रत्यक्षात बघणारी व्यक्ती सुद्धा ज्या देशात सूर्य किंवा दिवस नसतो त्या देशात सूर्य किंवा दिवस म्हणजे काय ते शब्दांनी सांगू शकली नाही, तेव्हा परमात्म्याच्या स्वरूप आणि प्रभावाला शब्दांद्वारा मनुष्य कसे समजावून सांगू शकेल? परमेश्वराची प्राप्ती झाल्यानंतरच परमात्म्याचे स्वरूप आणि प्रभाव यांना मनुष्य जाणू शकतो. परंतु तरी देखील तो दुसऱ्यांना समजावून सांगू शकत नाही, तरी सुद्धा शास्त्र आणि संतांद्वारा जे थोडेसे समजावून सांगितले जाते, ते परमेश्वराचे आभासमय वर्णन असते. भगवंतांनी आपला प्रभाव ठिकठिकाणी व्याख्या करून सांगितला आहे, परंतु गीतेचा अर्थ जाणून सुद्धा भगवंतांचे स्वरूप आणि प्रभाव योग्य प्रकारे समजत नाही.

भगवंत गीतेत म्हणतात -

**यद्यद्विभूतिमत्सत्त्वं श्रीमदूर्जितमेव वा ।**
**तत्तदेवावगच्छ त्वं मम तेजोंऽशसम्भवम् ।।**

(१० । ४१)

'जी जी काही विभूतियुक्त म्हणजेच ऐश्वर्य युक्त, कान्तियुक्त आणि शक्तियुक्त वस्तू आहे, त्या प्रत्येकीला तू माझ्या अंशाची अभिव्यक्ती म्हणून जाण.'

यातून असे जाणले पाहिजे की, या विश्वातील जे जे पदार्थ ऐश्वर्य, कांती, बल आणि प्रभावाने युक्त आहेत ते सर्व मिळून भगवंतांच्या प्रभावाच्या एका अवयवाचे प्रकटीकरण आहे.

म्हणून भगवंतांचा प्रभाव अपरिमित, अपार, अनंत आणि अनिर्वचनीय आहे. भगवंतांच्या सगुण-साकार स्वरूपाचे श्रद्धापूर्वक दर्शन, स्पर्श, संभाषण, चिंतन केल्याने सर्वात पापी असलेल्या मनुष्याचे सुद्धा त्वरित कल्याण होते. आपण भगवंतांचे स्मरण केले तरी सुद्धा आपल्याला अत्यंत मोठा लाभ आहे आणि भगवंत आपले स्मरण करतील तर तो सुद्धा फार मोठा लाभ आहे. आपण भगवंतांचे स्मरण

केले तर आपले हृदय अत्यंत पवित्र होऊन आपला उद्धार होऊ शकतो आणि भगवंत आपले स्मरण करतील तर त्या गुणसागर भगवंतांच्या हृदयातील आपल्या प्रवेशामुळे आपण अत्यंत पवित्र होऊन आपला उद्धार होऊ शकतो. म्हणून अंगदाने हनुमंताला असे म्हटले होते की, आपण वेळोवेळी भगवान श्रीरामांना माझी आठवण करून द्या -

**कहेहु दंडवत प्रभु सैं तुम्हहि कहउँ कर जोरि ।**
**बार बार रघुनायकहि सुरति कराएहु मोरि ।।**

(रा० च० मा०, उत्तर० १९ क)

म्हणून आपण प्रत्येक वेळी भगवंतांच्या स्वरूपाचे चिंतन केले पाहिजे; कारण भगवंतांचा असा नियम आहे की जो भगवंतांचे स्मरण करतो त्याचे स्मरण भगवंत देखील करतात -

**ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम् ।**

(गीता ४ । ११ चा पूर्वार्ध)

'जे भक्त मला ज्या प्रकारे भजतात, त्याचप्रकारे मी सुद्धा त्यांना भजतो.'

अशाप्रकारे भगवंतांनी आपल्यावर दृष्टी टाकली तर आपण अत्यंत पवित्र होऊन जातो आणि आपण भगवंतांचे दर्शन घेतले तर आपण अत्यंत पवित्र होऊन जातो आणि आपला उद्धार होऊ शकतो. असा तर सर्व प्रकारे आपल्याला अत्यंत लाभच आहे. मग भगवंतांशी संभाषण आणि त्यांच्या चरणस्पर्शाने उद्धार होईल यात सांगावे तरी काय?

परंतु श्रद्धेशिवाय असे होत नाही, जसे भगवान श्रीकृष्णांचे दर्शन घेऊन सुद्धा दुर्योधनाचा उद्धार झाला नाही. श्रद्धेशिवाय तर साक्षात भगवंतांचा वचनरूप गीतोपदेश वाचून सुद्धा उद्धार होऊ शकत नाही.

**अश्रद्दधानाः पुरुषा धर्मस्यास्य परंतप ।**
**अप्राप्य मां निवर्तन्ते मृत्युसंसारवर्त्मनि ।।**

(गीता ९ । ३)

'हे परंतप ! उपर्युक्त, धर्मावरील श्रद्धारहित हे पुरुष मला प्राप्त न होता मृत्युरूपी संसार चक्रात फिरत राहातात.'

परंतु जो भगवंतांवर श्रद्धा ठेवतो, भगवंतांच्या दिव्य जन्माला आणि कर्मांच्या तत्त्व-रहस्याला जाणतो त्याचा त्वरितच उद्धार होतो -

**जन्म कर्म च मे दिव्यमेवं यो वेत्ति तत्त्वतः ।**
**त्यक्त्वा देहं पुनर्जन्म नैति मामेति सोऽर्जुन ।।**

(गीता ४ । ९)

'हे अर्जुना ! माझा जन्म आणि कर्मे दिव्य म्हणजेच निर्मळ आणि अलौकिक आहेत - असे जो मनुष्य तत्त्वपूर्ण जाणतो, तो शरीराचा त्याग करून पुन्हा जन्म पावत नाही, परंतु मलाच प्राप्त होतो.'

अर्जुनासारख्या श्रद्धाळू, योग्य अशा व्यक्तीलाच भगवंत आपल्या जन्माचे (अवताराचे) रहस्य सांगतात -

**अजोऽपि सन्नव्ययात्मा भूतानामीश्वरोऽपि सन् ।**
**प्रकृतिं स्वामधिष्ठाय सम्भवाम्यात्ममायया ।।**

(गीता ४ । ६)

'मी अजन्मा आणि अविनाशी स्वरूप असून सुद्धा, तसेच संपूर्ण प्राणिमात्रांचा स्वामी असून सुद्धा, आपल्या प्रकृतीला आधीन करून, आपल्या योगमायेने प्रकट होत असतो.'

परंतु राक्षसी, आसुरी आणि मोहमय स्वभाव असणारे मूर्ख लोक श्रद्धाविरहित आणि अपात्र असल्यामुळे भगवंतांचे रहस्य जाणत नाहीत, म्हणून भगवंतांचा हे लोक तिरस्कार करतात (पहा गीता ९ । ११-१२). अश्रद्ध असलेले ते लोक भगवंतांच्या प्रभावापासून अनभिज्ञ असतात, म्हणून भगवंत त्यांच्यासमोर प्रकट होत नाहीत, आपल्या स्वतःवर योगमायेचे पटल घालून राहतात, भगवंतांनी स्वतःच म्हटले आहे -

**नाहं प्रकाशः सर्वस्य योगमायासमावृतः ।**
**मूढोऽयं नाभिजानाति लोको मामजमव्ययम् ।।**

(गीता ७ । २५)

'आपल्या योगमायेने गुप्त असलेला असा मी सर्वांपुढे प्रकट होत नाही, म्हणून हा अज्ञानी जनसमुदाय, जन्मरहित, अविनाशी परमेश्वर अशा मला जाणत नाही म्हणजेच मला जन्ममरण युक्त मानतो.'

अर्जुन हा भगवंतांचा श्रद्धाळू आणि प्रेमळ भक्त होता, म्हणून भगवंत त्याच्यासमोर प्रकट झाले आणि त्याला ओळख दिली की 'मीच साक्षात परब्रह्म परमात्मा आहे' (गीता ४ । ६). 'तू मला शरण येऊन माझीच भक्ती कर, त्यामुळे तू मलाच प्राप्त होशील.' (गीता ९ । ३४) अठराव्या अध्यायाच्या शेवटच्या उपदेशात सुद्धा सांगतात -

**सर्वगुह्यतमं भूयः श्रृणु मे परमं वचः ।**
**इष्टोऽसि मे दृढमिति ततो वक्ष्यमि ते हितम् ।।**
**मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ।**
**मामेवैष्यसि सत्यं ते प्रतिजाने प्रियोऽसि मे ।।**

(गीता १८ । ६४-६५)

'सर्व गोपनीयांमध्ये गोपनीय असे माझे रहस्ययुक्त शब्द तू पुन्हा ऐक. तू माझा अत्यंत लाडका आहेस, म्हणून हे अत्यंत हितावह असे शब्द मी तुला सांगेन. अर्जुना ! माझ्याच ठिकाणी चित्तलय करणारा हो, माझा भक्त हो, माझे पूजन करणारा हो आणि मला नमस्कार कर. असे केल्याने तू मलाच प्राप्त होशील; हे मी तुला सत्य प्रतिज्ञा करून सांगत आहे; तू मला अत्यंत प्रिय आहेस.'

भगवंतांनी आपल्या स्वरूपाचे वर्णन सुद्धा जागोजागी केले आहे. निर्गुण स्वरूपाचे १२ व्या अध्यायातील तिसऱ्या श्लोकात, सगुण निराकार स्वरूपाचे ८ व्या अध्यायातील ९ व्यात तसेच ९ व्या अध्यायातील ४,५,६,१८ श्लोकांमध्ये आणि सगुण साकार विश्वरूपाचे ११ व्या अध्यायातील ५,६,७ व्यात वर्णन केले आहे. अर्जुनाने भगवंतांना सगुण-साकार चतुर्भुज स्वरूपाचे दर्शन देण्यासाठी प्रार्थना केली (गीता ११ । ४६), तेव्हा भगवंतांनी आपले चतुर्भुज स्वरूप अर्जुनाला दाखविले, हयाचे वर्णन ११ व्या अध्यायातील ५० व्या

श्लोकात आढळते म्हणून सगुण-निर्गुण, साकार-निराकार ही सगळी भगवंतांची रूपे आहेत. ह्याच्या तत्त्व रहस्याला जो जाणतो त्याचा निश्चितच उद्धार होतो.

अशाप्रकारे, जगताच्या कल्याणासाठी भगवंत आपला अधिकार देऊन ज्या भक्ताला पाठवतात किंवा असेच जे महात्मे आहेत, त्यांच्यापैकी कोणाला तरी आपला अधिकार देऊन टाकतात, त्या पुरुषांच्या सुद्धा श्रद्धापूर्वक दर्शनाने, चरण-स्पर्शाने, संभाषणाने, चिंतन केल्याने, मनुष्य अत्यंत पवित्र होतो; त्यामुळे त्याचा उद्धार होऊ शकतो; कारण की, ईश्वर आणि ईश्वराचा अधिकार प्राप्त झालेल्या संतांकडून जे काही पाहिले जाते, स्पर्श केले जात, मनन केले जाते, ते सर्व काही अत्यंत पवित्र होऊन जाते. त्या संतांचा प्रभाव अत्यंत विलक्षण, दिव्य अलौकिक आणि अपरिमित आहे, परंतु असे संत अनेक कोटींमध्ये एक असे असतात. भगवंतांनी गीतेत सांगितले आहे -

**मनुष्याणां सहस्रेषु कश्चिद् यतति सिद्धये ।**
**यततामपि सिद्धानां कश्चिन्मां वेत्ति तत्त्वतः ।।**

(७ । ३)

'हजारों पैकी एक माझ्या प्राप्तिसाठी प्रयत्न करतो आणि प्रयत्न करणाऱ्या त्या योग्यांपैकी सुद्धा एखादा मत्परायण होऊन मला तत्त्वतः जाणतो.'

म्हणून मुळातच परमेश्वराची प्राप्ती करून घेणारे लोक या जगात खूपच कमी आहेत. त्यांच्यातही अधिकार प्राप्त झालेले तर अधिकच दुर्लभ आहेत. त्या संतांचा सहवास लाभणे तर फारच कठीण आहे, जरी त्यांचा सहवास प्राप्त झाला तरी त्यांना ओळखणे फारच कठीण असते, कारण त्यांना स्वतःला काही जरूर नसते की त्यांनी आपली जाणीव इतरांना करून द्यावी आणि सामान्य माणसाची तर त्यांना ओळखण्याची योग्यता नसते, जरी असे म्हटले की गीतेच्या दुसऱ्या अध्यायातील ५५ ते ५८ व्या श्लोकापर्यंत, ६ व्या अध्यायातील ७ ते

९ व्या पर्यंत, १२ व्या अध्यायातील १३ ते १९ व्या पर्यंत आणि १४ व्या अध्यायातील २२ ते २५ व्या श्लोकापर्यंत इत्यादी इत्यादी श्लोकांत जी लक्षणे सांगितली आहेत त्यानुसार आपण त्यांना ओळखू शकतो तर ही गोष्ट कठीण आहे; कारण ही सर्व लक्षणे स्वसंवेद्य आहेत, परसंवेद्य नाहीत. असे म्हटले की मग त्यांना कसे ओळखायचे तर याचे उत्तर आहे की ज्याच्या दर्शनाने संभाषणाने आपल्या ठिकाणी संतांच्या उपर्युक्त लक्षणांचा अविष्कार झाला तर तेच आपल्या दृष्टीने संत आहेत.

जर संतांची श्रद्धापूर्वक सेवा, संभाषण आणि नमस्कार इत्यादी केले गेले तर एका संतापासून अनेक संत निर्माण होऊ शकतात, जसे जर दिव्यात तेलवात असेल तर एका दिव्यापासून अनेक दिवे लावले जातात. येथे श्रद्धा आणि विश्वास हीच तेलवात आहे. संतांच्या आज्ञेनुसार वागणे म्हणजे श्रद्धा होय आणि त्यांच्या संकेतानुसार वागणे म्हणजे विशेष श्रद्धा होय. त्याहीपेक्षा अधिक श्रद्धा हीच आहे की त्यांच्या नियमांना जाणून त्यांच्या मतानुसार वागणे म्हणजेच त्यांच्या इच्छेनुसार कठपुतळीप्रमाणे हालचाल करणे. एखादी गोष्ट त्यांना विचारायची असेल तर त्यांना साष्टांग नमस्कार करून जिज्ञासू वृत्तीने सरळपणे, श्रद्धा, विनय आणि प्रेमपूर्वक विचारू शकतो. भगवंत अर्जुनाला म्हणतात -

**तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया ।**
**उपदेक्ष्यन्ति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्वदर्शिनः ।।**

(गीता ४ । ३४)

'त्या परमेश्वराच्या यथार्थ ज्ञानाला तू तत्त्वदर्शी ज्ञानीजनांकडे जाऊन जाणून घे, त्यांना उत्तमप्रकारे नमस्कार केल्यामुळे, त्यांची सेवा केल्याने आणि निष्कपटपणे, सरळपणे प्रश्न केल्याने, परमात्मतत्त्वाला उत्तम प्रकारे जाणणारे ते ज्ञानी संत तुला त्या तत्त्वज्ञानाचा उपदेश करतील.'

भगवंतांनी जिज्ञासूंसाठी हे कर्तव्य सांगितले आहे परंतु संतांना मात्र या सर्वांचा स्वीकार करावयास सांगितलेले नाही. जिज्ञासूंकडून अशाप्रकारे आचरण केल्यावर सुद्धा संत त्याचा स्वीकार करत नाही. कारण त्याच्या शरीरात कोणीही धर्मी नाही; तेव्हा कोण स्वीकार करणार? परंतु अशाप्रकारे सेवा इत्यादी करणारी कोणी जिज्ञासू, श्रद्धाळू अशी योग्य व्यक्ती असेल तर तो तिला विरोधही करत नाही. विरक्त असणे हा तर त्यांचा स्वभावच आहे. कारण विवेक, वैराग्य, उपरती इत्यादी गुण तर त्यांच्या ठिकाणी साधना काळातच स्वाभाविक उत्पन्न झालेले असतात.

जे उच्चदर्जाचे संत असतात ते व्यक्ती होऊन आपली स्वत:ची पूजा करवून घेत नाहीत, कारण देहावर त्यांची काडीमात्र ममता व अभिमान नसतो. जो कोणी स्वत:ला महात्मा म्हणून समजतो, आपल्या पूजन, आदर, सत्कार, सन्मान, मोठेपणा प्रतिष्ठा यांच्यातून दुसऱ्यांचा उद्धार होतो असे समजतो, तो महात्माच नव्हे कारण आपल्याला श्रेष्ठ समजणे, दुसऱ्याला तुच्छ लेखणे, आपल्याला महात्मा आणि दुसऱ्याला अज्ञानी समजणे तर अत्यंत निकृष्ट दर्जाची गोष्ट आहे. संतांची तर देहावर अहंता-ममता नसते आणि देहात कोणी असा धर्म धारण करणाराही नसतो, मग मान-पान-प्रतिष्ठा आदर इत्यादींची इच्छा कोण करेल? जे मान-मरातब-प्रतिष्ठा आदर इत्यादींची अपेक्षा बाळगतात ते तर उच्च प्रतीचे साधकही नाहीत उलट ते मान-मरातब-प्रतिष्ठा इत्यादींचे दास आहेत.

वर सांगितले आहे की ईश्वर अश्रद्ध लोकांसमोर आपल्या स्वत:वर योगमायेचा पडदा पाडून असतात, अशाप्रकारे ह्या रहस्याला जाणणारे, भगवंतांचे खरे अनुयायी संत सुद्धा आपल्या स्वत:वर मायेचा पडदा घालून सामान्य माणसाप्रमाणे राहात असतात. परंतु जो खरोखरच जिज्ञासू, श्रद्धाळू आणि योग्य आहे, त्याच्यासमोर ते कधी त्यांच्या कृतीतून भगवत्प्राप्तीरूप आपल्या अवस्थेचा अभिमानरहित

भावाने अनुभव जरी देऊन गेले तरी त्यात त्यांचा काहीही दोष नाही. खरे तर ते महात्मा असून सुद्धा लोकसंग्रहाच्या उद्देशाने जिज्ञासू आणि साधकांप्रमाणे सामान्यपणे फिरत असले तरी त्यामुळे त्यांची परमात्म-प्राप्तिरूप स्थिती नष्ट होत नाही. परंतु सामान्य माणूस महात्मा होऊन पूजा करवून घेईल तर तो त्याच्या दृष्टीने भारच होय; कारण की, महात्मापुरुष, सकाम-भावाने शास्त्रानुसार कर्म करणाऱ्या अज्ञानी लोकांच्या कर्मांचे निष्काम आणि अनासक्तभावाने लोकसंग्रहासाठी अनुकरण करतात. (पहा गीता ३ । २५). जर असे म्हटले की सकामी अज्ञानी माणसाने शास्त्रानुसार केलेल्या कर्मांचे अनुकरण ज्ञानी पुरुष का बरे करतात, तर त्याचे उत्तर असे आहे की, सकामी मनुष्य असा विचार करतो की जर कर्मांच्या विधिमध्ये काही न्यूनता राहिली तर आपल्याला कर्म फळ मिळणार नाही; फळाच्या इच्छेच्या लोभाने शास्त्राच्या आज्ञेचे पालन ते चांगल्याप्रकारे करतात, म्हणून त्या कर्मांमध्ये विपरीतता किंवा न्यूनता येण्याची शंकादेखील राहात नाही, म्हणून संत हे निष्काम, अनासक्त आणि निरभिमानी असे राहून लोकसंग्रह म्हणजेच लोककल्याणासाठी त्या सकाम अज्ञानी लोकांच्या शास्त्रोक्त कर्मांचे अनुकरण करतात.

ईश्वर आणि संतांच्या स्वरूप आणि प्रभावाचे यथार्थ ज्ञान त्यांच्या कृपेनेच होते. म्हणून त्यांची कृपा संपादन करण्यासाठी श्रद्धापूर्वक निष्काम भावाने (गीता ९ । ३४ आणि ४ । ३४ प्रमाणे) सर्व प्रकारे त्यांना शरण जावे.

*****

# भगवंतांच्या परमदिव्य गुणसंपन्न स्वरूपाचे ध्यान

भगवंतांच्या ध्यानासारखे जगात कल्याणाचे दुसरे कोणतेही साधन नाही. म्हणून माणसाने भगवंतांचे ध्यान श्रद्धा आणि प्रेमपूर्वक निष्काम भावनेने सदैव केले पाहिजे. एकांतवास, सत्संग, सत्शास्त्रांचे अध्ययन आणि मनन, नामजप, स्वरूपाचे स्मरण, लीला आणि गुणप्रभावाचे चिंतन, तत्त्व आणि रहस्याचे ज्ञान, भगवंतांच्या ठिकाणी श्रद्धा आणि प्रेम तसेच ऐहिक सुखांपासून वैराग्य आणि उपरति - ही सर्व भगवंतांच्या ध्यानासाठी विशेष उपयोगी आहेत; कारण की भगवंतांच्या नामजपाने स्वरूपाची स्मृती होते, स्वरूपाच्या स्मृतीने चरित्राची (लीलेची) स्मृती होते, लीलेच्या स्मृतिमुळे गुणप्रभावाची अनुभूती येते, ह्या सर्वांच्या स्मरणाने आणि मननाने भगवंतांचे तत्त्वरहस्य जाणले जाते, त्यामुळे श्रद्धा व प्रेम वाढते, तेव्हा ऐहिक भोगांपासून वैराग्य आणि उपरति होऊन भगवंतांच्या ध्यानात सखोल अवस्था प्राप्त होते.

म्हणून साधकाची आवड साकार-निराकार, सगुण-निर्गुण अशा ज्या स्वरूपाच्या ठिकाणी असेल, त्याने आपल्या इष्ट देवतेच्या स्वरूपाचे ध्यान करावे. त्या परमात्म्याच्या निर्गुण-निराकारासहित असंख्य दिव्य गुणांनी संपन्न, सगुण साकार स्वरूपाचे ध्यान केले गेले तर अधिकच उत्तम आहे. असे ध्यान म्हणजेच भगवान पुरुषोत्तमांच्या समस्वरूपाचे ध्यान होय. ते समजावून सांगण्यासाठी त्याच्यासारखे दृष्टांत, दार्ष्टांत, उदाहरण, रूपक, उपमा इत्यादी या जगात उपलब्धच नाही. ज्या देशात सूर्य नाही त्या अंधकारमय देशात कोणत्याही दृष्टांताने सूर्याच्या स्वरूपाला समजावून घेणे कधीच शक्य नाही. कारण जेव्हा सूर्यासारखी दुसरी कोणतीही वस्तू नाहीच तर त्याला कोणत्या रूपात कसे समजावून सांगायचे? अशाच प्रकारे परमेश्वराचे ते अत्यंत विलक्षण, जाणण्यास

कठीण असे स्वरूप कोणताही दृष्टांत देऊन येथे समजावून सांगणे कठीण आहे.

ज्याप्रमाणे आकाशात सूर्यकिरणांमध्ये कारणभूत परमाणुरूपात असलेले पाणी अव्यक्त आणि अप्रकट असते ते दुर्बीण किंवा इतर कोणत्याही साधनांनी दृष्टिला दिसू शकत नाही; परंतु तेच पाणी जेव्हा रसमय होऊन आकाशात स्थिर राहते, त्यावेळी सुद्धा दिसू शकत नाही परंतु विचारांनी अनुभवास येऊ शकते आणि तेच जल जेव्हा मेघ आणि पाण्याच्या थेंबांचे रूप धारण करून गारांच्या स्वरूपात वर्षाव करू लागते तेव्हा ते प्रत्यक्ष पाहात असताना पकडता देखील येते. त्या व्यक्त जलामुळे पाण्याचा यथायोग्य उपयोग करता येतो. पाण्याचे हे उदाहरण चैतन्यमय परमेश्वराच्या संकल्पनेला योग्य प्रकारे उपयुक्त नाही; कारण की पाणी हे जड, परिणामशील, विनाशी, एकदेशीय, अल्प आहे तसेच परमेश्वर ह्या सर्वांपेक्षा विलक्षण, नित्य, चेतन, निर्विकार आणि अनंत आहे, म्हणून त्या अनुपम आणि अप्रमेय परमात्म्यासाठी कोणताही दृष्टांत किंवा उदाहरण देता येतच नाही. परंतु संत एखादा दृष्टांत देऊन समजावून सांगण्यासाठी, यथाशक्ती त्याचे तत्त्व अंशतः का होईना समजावून सांगतात.

जसे अव्यक्त कारणरूपात असलेले निराकार जलच रसाच्या रूपाने व्यक्त होते, त्याप्रमाणे ते निर्गुण-निराकार ब्रह्मच भक्तांच्या प्रेम आणि श्रद्धेमुळे विज्ञानानंदमय सगुण-निराकाररूपात व्यक्त होत असते. नंतर तेच जल जसजसे मेघ आणि थेंबांच्या रूपात प्रकट होऊन गारांचे रूप धारण करते, त्याचप्रमाणे दिव्य-चिन्मय अत्यंत कल्याणमय गुणसमूहांचा महासागर, सगुण-निराकार परमेश्वर, अनंत महान प्रकाशाच्या रूपात प्रकट होऊन पुन्हा नित्य दिव्य प्रकाशपुंज सगुण साकार रूपात प्रकट होऊन दिसू लागतो. ज्या अत्यंत प्रेमळ श्रद्धाळू भक्ताला भगवंतांच्या त्या दिव्य स्वरूपाचे दर्शन होते, त्या भगवद्भक्ताची दृष्टी देखील दिव्य होऊन जाते. भगवंतांचा भक्त भगवंतांच्या कृपेने ह्या चर्मचक्षूंनी सुद्धा

भगवंतांच्या त्या अतिदिव्य अद्‌भुत स्वरूपाचे दर्शन घेऊ शकतो. भगवद्दर्शन प्राप्त झाल्यावर तो भक्त आनंदात एवढा तन्मय होऊन जातो की त्याला आपल्या स्वत:ची देखील जाणीव राहात नाही. एका भगवंताशिवाय त्याला इतर कशाचीही जाणीव राहात नाही. तो आपल्या स्वत:लाच विसरून जातो. त्या रूपमाधुर्याच्या दर्शनाने त्याच्या डोळ्यांची पापणी देखील हलत नाही. तो एकटक पापणी न हलविता डोळ्यांनी त्या रूपमाधुर्याचे दर्शनच घेत राहातो. नंतर सावध झाल्यावर सुद्धा तो भक्त त्या दिव्य-रूपमाधुर्याचे वर्णन करू शकत नाही, कारण त्या असीम अप्रमेय दिव्य-गुणगणसंपन्न मधुर मूर्तीचे वर्णन करण्यास वाणी सर्व प्रकारे असमर्थ होते. मग माझ्यासारखा एक सामान्य माणूस त्या अत्यंत दिव्य रूपमाधुर्याचे काही शतांशाने देखील वर्णन करण्यास कसा बरे समर्थ होऊ शकेल? परंतु काही प्रेमळ बन्धुजनांच्या आग्रहाने या विषयी थोडेसे लिहिले आहे. ती केवळ माझी धिटाई आहे, त्यासाठी ज्ञानीजन मला क्षमा करोत.

ज्यावेळी भगवंत प्रकट होतात, त्या पूर्वीच साधकाच्या शरीराबाहेर आणि आत मन, बुद्धी आणि इन्द्रियांमध्ये तसेच शरीरातील अणु-अणूमध्ये अनंत, अत्यंत दिव्य अलौकिक चैतन्य, प्रसन्नता, शांती, समता आणि आनंद परिपूर्ण होतात. मग परमेश्वराचे हे सगुण-निराकार स्वरूपच सगुण-साकाररूपात परिणत होऊन त्याच्यासमोर दृष्टिगोचर होते. अत्यंत प्रेमानंदस्वरूप भगवंतांची ही दिव्य मधुर मूर्ती अत्यंत मनोहर, अनंत, प्रेममयी, दिव्य, अमृतमयी, अत्यंत रसमयी आणि परमानंदमयी असते. हया अत्यंत दिव्य मूर्तीचे आपादमस्तक ध्यान करून साधकदेखील रसमय, प्रेममय, अमृतमय आणि आनंदमय होऊन जातो. म्हणून साधकाने त्या प्रेमानंदमयी मूर्तीचा साक्षात्कार होण्यासाठी आपल्यासमोर आकाशात पुढीलप्रमाणे तिचे ध्यान केले पाहिजे.

आपल्या डोळ्यांपासून जवळ जवळ तीन हात लांब अंतरावर आकाशात साक्षात विज्ञानानंदघन पूर्णब्रह्म परमेश्वरच दिव्य चैतन्यमय

महान प्रकाशमय सगुण-साकार श्रीविष्णूंच्या रूपात शोभून दिसत आहेत. ते संपूर्ण सौंदर्यनिधी आणि आपल्या अनंत महिम्याने नित्य महिमायुक्त आहेत. ते नीलमण्याप्रमाणे सावळे असून सुद्धा दिव्य निर्मल उज्ज्वल प्रकाशामुळे किंचित निलीमायुक्त अतिशुभ्र रूपात अनंत सूर्यापेक्षा अधिक प्रकाशित आणि दैदीप्यमान होत आहेत, परंतु तो महान तेजोमय प्रकाश, शीतलतेचा पुंज असलेल्या चंद्रापेक्षा अधिक अत्यंत शीत आहे. त्यांचे शरीर षोडशवर्षीय राजकुमारासारखे जवळ जवळ साडेतीन हात उंच आणि एक हात रुंद आहे. त्यांच्या चरणांच्या तळव्यांना गुलाबी रंगाची झाक आहे आणि त्यावरील ध्वज, यव, अंकुश, शंख, चक्र, कमळ, वज्र. स्वस्तिक इत्यादी चिह्न शोभत आहेत. त्यांचे चरण आणि चरणांची बोटे खूपच चमकदार, नाजुक, मऊ, अत्यंत सुंदर आहेत. बोटांशी संलग्न, प्रकाशित चंद्राप्रमाणे दिसणाऱ्या नखांच्या ओळीतून निघणारे तेज काही निराळ्याच प्रकारचे आहे, जणू दिव्य रत्ने चमकत आहेत. भगवंतांच्या पावलांवर असलेल्या नूपुरांचा ध्वनी इतका अमृताप्रमाणे मधुर आहे की कर्णविवरांमध्ये प्रवेश करताच साधकाचे मन त्यातच तल्लीन होऊन मंत्रमुग्ध झाल्याप्रमाणे स्तब्ध होते. त्यांच्या मृदुचरणांचा स्पर्श फारच विलक्षण, अत्यंत अमृतमय, अतिशय रोमांचकारी आणि परमानंददायक आहे, भगवंतांनी अत्यंत दिव्य नाजुक आणि झळाळणारा पीतांबर परिधान केला आहे; त्याच्या आतून भगवंतांची मोठी प्रकाशयुक्त देहद्युती चमकत आहे. त्यांच्या पोटऱ्या, गुडघे आणि मांड्या सुद्धा अतिशय कोमल, मऊ, तेजस्वी आणि अतिसुंदर आहेत. भगवंतांनी आपल्या पातळ आणि अत्यंत सुंदर कटीभागावर दिव्य रत्नजडित करगोटा धारण केला आहे. ब्रह्मदेवाचे उत्पत्तिस्थान असलेले असे त्यांचे नाभिकमळ अतिशय खोल आहे आणि उदर त्रिवलयांनी अतिशय सुशोभित असे अत्यंत सुंदर आहे. भगवंतांचे वक्ष:स्थळ विशाल, अत्यंत पुष्ट, अतिशय मोहक आणि रुंद आहे. भगवंतांच्या चार भुजा आहेत. दोन वरच्या दिशेला उभारल्या आहेत आणि दोन खालच्या

दिशेला गुडघ्यापर्यंत पोहोचलेल्या आहेत. बाहू लांब, अतिशय नाजुक, मऊ, तेजस्वी, अत्यंत पुष्ट, बलशाली, गोलाकार, निमुळते (क्रमाने वरून मोठे आणि खाली बारीक होणारे) तसेच अत्यंत सुंदर आहेत. भगवंतांचे तळहात लालसर, अत्यंत सुंदर अशा शंख चक्र, कमळ, यव, अंकुश, ध्वजा, स्वस्तिक इत्यादी चिह्नांनी सुशोभित आणि अत्यंत सौंदर्ययुक्त आहेत. त्यांच्या बोटांशी सलग अशा नखांच्या रांगांतील तेज अतिशय उज्ज्वल आणि फारच मनोहारी आहे, जणू दिव्य रत्नांची ओळच चमकत आहे चारही हातांच्या बोटांमध्ये रत्नजडित स्वर्णमय अंगठ्या आणि मनगटावरील कडी आणि बाहूवरील बाजुबंद सुंदर दिसत आहेत. भगवंतांच्या अधोदिशेकडिल उजव्या हातात कौमोदाची गदा आणि डाव्या हातात सुंदर कमळ आहे आणि उर्ध्व दिशेच्या उजव्या हातात अत्यंत तेजस्वी असे सुदर्शन चक्र आणि डाव्या हातात अतिशय उज्ज्वल असा पांचजन्य नावाचा शंख शोभून दिसत आहे. आपल्या निळसर कंठात त्यांनी अत्यंत दैदिप्यमान अशा, मोती रत्ने आणि सुवर्ण युक्त माला धारण केल्या आहेत तसेच तुलसी आणि अलौकिक फुलांच्या माळा गुडघ्यापर्यंत लोंबत आहेत. कोवळी पाने आणि फुलांच्या गुच्छांनी तयार केलेल्या हारांमुळे शंखाकृती कंठ मोठा सुंदर दिसत आहे. त्यांच्या वक्षःस्थलावर रत्नजडित चंद्रहार आणि अत्यंत सुंदर असा कौस्तुभमणी बालरवीप्रमाणे झळकत आहे. स्वच्छ आरशात स्पष्ट प्रतिबिंब दिसावे त्याप्रमाणे वक्षःस्थलाच्या मध्यभागी श्रीवत्स चिह्न दिसते. त्याच्या वरच्या दिशेला भृगुलत्तेचे चिह्न आहे. भगवंतांचे खांदे उंच पुष्ट आणि कोमल आहेत. त्यावर सोन्याचे जानवे आणि केशरी रंगाचे उत्तरीय धारण केलेले आहे. भगवंतांची मान उंच आहे आणि कंठ व हनुवटी खूपच सुंदर आहे. भगवंतांचे अधर आणि ओठ, तोंडल्याप्रमाणे, माणकाप्रमाणे आणि पोवळ्याप्रमाणे चमकत आहेत. भगवंत मंद मंद स्मित करत आहेत. त्यांचे मुखकमल, उमललेल्या कमलपुष्पाप्रमाणे सुंदर हास्य, अत्यंत सुशोभित, उज्ज्वल कांती आणि निर्मळ उल्हासयुक्त

आहे, त्यामुळे शुभ्र दंतपंक्ती मोत्यांच्या ओळीप्रमाणे अत्यंत सुशोभित आणि अत्यंत मनोहर दिसत आहेत, भगवंतांची वाणी फारच सुंदर, स्पष्ट कोमल आणि गोड आहे, ती कर्णद्रोणांना अमृततुल्य प्रिय अशी वाटते. नासिका खूपच सुंदर आहे. भगवंतांचे गाल चमकदार, मऊ, कोमल, स्वच्छ आणि मंद मंद गुलाबी रंगाच्या झळाळीने युक्त अत्यंत तेजस्वी आहेत, कानातील कुंडलांची शोभा त्यावर झळकत आहे. अत्यंत सुंदर आणि विशाल कानांवर मकराकृती रत्नजडित सुवर्णमय कुंडले, बालसूर्याप्रमाणे झळकत आहेत. भगवंतांचे नेत्र विशाल कमलपत्राप्रमाणे अत्यंत सुंदर, मोठे, चमकदार आणि फुललेल्या कमलपुष्पाप्रमाणे अत्यंत प्रफुल्लित आणि अत्यंत तेजस्वी आहेत. भगवंत आपल्या अपार प्रेम आणि दयेने माझ्याकडे एकटक पहात असताना जणू काय प्रेम, दया, आनंद, शांती, समता, ज्ञान इत्यादी गुणांचा माझ्यावर अखंड वर्षाव करत आहेत आणि ज्याप्रमाणे पौर्णिमेच्या चंद्राच्या किरणांनी वनस्पतींमध्ये अमृतमय रस परिपूर्ण होतो, त्याप्रमाणे भगवंतांच्या नेत्रांतून प्रवाहित होणारी ती दिव्य अमृतमय गुणांची अजस्रधारा माझ्या मन, बुद्धी, इंद्रिये आणि शरीरातील अणू रेणूंना आपल्या त्या अत्यंत दिव्य रसाने व्यापून टाकत सर्वत्र परिपूर्ण होत आहे, त्यामुळे ते गुण माझ्यात प्रवेश करून रोमरोमात चांगल्या प्रकारे भिनल्यामुळे अशा प्रकारचे चैतन्य, आनंद शांती आणि प्रेमाचे मधुर रसास्वादन करवित आहेत की ज्याला काही सीमाच नाही. मी भगवंतांच्या त्या अखिल सौंदर्य-रससुधानिधि मुखकमलाचे अवलोकन करून वारंवार मुग्ध होत आहे आणि एकटक निर्निमेष नेत्रांनी त्यांच्या मुखाचे अवलोकन करत आहे. भगवंतांच्या पापण्या भ्रमरांप्रमाणे काळ्याभोर आणि भुवया विशाल आणि अत्यंत सुंदर आहेत, ज्यातून त्यांची संपूर्ण प्राणिमात्रांवरील कृपा सूचित होत आहे. भगवंतांचे कपाळ तेजस्वी, गुळगुळीत, अतिविशाल आणि अत्यंत सुंदर आहे, त्यावर अत्यंत सुंदर असा श्रीधारण टिळा आहे. मस्तक चमकदार, मऊ काळ्या कुरळ्या केशकलापाने सुंदर

दिसत आहे, पारिजात इत्यादींची फुले केसात गुंफलेली आहेत. मस्तकावर रत्नजडित सोन्याचा अत्यंत तेजस्वी दिव्य मुकुट झळकत आहे. भगवंतांच्या मुखकमलाच्या भोवताली सूर्यकिरणांप्रमाणे दिव्य प्रकाशाची अत्यंत उज्ज्वल किरणे पाझरत आहेत. त्यांचे मुखकमल अमृतमय अशा शरद् पौर्णिमेच्या चंद्रापेक्षा सुद्धा अधिक तेजस्वी, शोभायमान आणि अत्यंत सुंदर आहे. भगवंतांच्या श्रीविग्रहातून अत्यंत दिव्य, अत्यंत मधुर सुगंध बाहेर पडत आहे, की जो मी आपल्या नाकपुड्यांनी ग्रहण करून जणू अमृतपानच करत आहे. भगवंतांचे दर्शन, भाषण, स्पर्श, चिंतन, वार्तालाप - सर्व काही प्रेममय, रसमय आणि आनंदमय आहे.

भगवंतांचे श्रीविग्रह, वस्त्र, अलंकार, आभूषणे, आयुधे, हार इत्यादी सर्वकाही दिव्य, चिन्मय आहे. भगवंतांच्या श्रीविग्रहाचे सौंदर्य एवढे मधुर आणि मनोवेधक आहे की जे पाहिल्यानंतर पशुपक्षी सुद्धा मोहित होतात, मग मानवांची काय गोष्ट. त्यांच्या सुंदर - लावण्यमय आकृतीला पाहून कामदेव देखील लाजतो. कोटी कोटी कामदेवांचे सौंदर्य देखील भगवंतांच्या सौंदर्यासमोर काहीच नाही. भगवंतांचे ते रूपमाधुर्य भक्तांवर एक प्रकारच्या जादूचेच काम करते. त्या रूपमाधुर्याच्या दर्शनाने एवढे आकर्षण निर्माण होते की पुन्हा ते सोडलेच जाऊ शकत नाही. संपूर्ण जगताचे सर्व सौंदर्य एकत्र केले तरी भगवंतांच्या सौंदर्याच्या एक अंशाइतके देखील ते नाही. त्यांच्या प्रेममय सौंदर्याचा महिमा कोणीही गाऊ शकत नाही. भगवंतांच्या नेत्रांची प्रेममय दृष्टी पडताच मनुष्य भगवंतांच्या प्रेमात एवढा तन्मय होतो, की तो भगवंतांना कधी विसरूच शकत नाही, उलट तो नेहमी आपल्या डोळ्यांनी भगवंतांच्या रूपमाधुर्याचे प्राशनच करत राहतो. भगवंतांच्या त्या प्रत्यक्ष रूपमाधुर्याबद्दल काय बोलावे, स्वप्नात देखील त्यांचे दर्शन घडते, तेव्हा मनुष्य एवढा प्रेममग्न होतो की आपल्या आयुष्यात तो कधीही विसरू शकत नाही, तसेच त्यांच्या ठिकाणी एवढे अद्भुत आकर्षण आहे की तो रसमय विग्रह एकदा जरी स्मरणात आला तरी तो भक्त तो विसरण्यास

असमर्थच होतो आणि त्या अमृतमय रसाचा आस्वाद घेणारा तो कधीच तृप्त होत नाही. उलट त्या प्रेममय अतृप्तीत आपल्या स्वत:ला विसरून जातो आणि त्यांच्या गुणांचे वारंवार स्मरण करण्यात मुग्ध होतो.

भगवंतांच्या ठिकाणी अपार आणि अत्यंत विलक्षण सौम्यता, शांती, प्रेम, सौहार्द, माधुर्य, सौंदर्य, रमणीयता, रुचिरता, मनोहरता, नित्यनूतनता, औदार्य, वीरता, निरभिमानिता, निर्वैरता, भक्तवात्सल्य, प्रेमाधीनता, पतितपावनता, सर्वमंगलकारिता, सच्चिदानंदस्वरूपता, सर्वाराध्यता, कृतज्ञता, दानशीलता, धार्मिकता, सर्वश्रेष्ठता, तत्त्वज्ञता, बुद्धिमत्ता, वाग्मिता, शास्त्रज्ञता, समस्तभाषाभिज्ञता, प्रियवादिता, मनस्विता, दक्षता, सर्वचित्ताकर्षक मधुरभाषिता, शरणागत संरक्षण, सज्जनांचे परित्राण, भक्त सौहार्द, न्याय, दृढव्रत, पाण्डित्य, प्रतिभा, परमानंद, परमगती, सर्वसिद्धी, समृद्धी, सर्ववशित्व, असाधारण अद्भुत शोभा, सर्वाकर्षणत्व आणि अद्भुत चमत्कार इत्यादी अनंत दिव्य गुण आहेत. याशिवाय भागवतात सुद्धा सत्य, पावित्र्य, दया, क्षमा इत्यादी अनेक गुणांचे वर्णन आढळते. पृथ्वीने धर्माला म्हटले आहे -

**सत्यं शौचं दया क्षान्तिस्त्यागः संतोष आर्जवम् ।**
**शमो दमस्तपः साम्यं तितिक्षोपरतिः श्रुतम् ।।**
**ज्ञानं विरक्तिरैश्वर्यं शौर्यं तेजो बलं स्मृतिः ।**
**स्वातन्त्र्यं कौशलं कान्तिर्धैर्यं मार्दवमेव च ।।**
**प्रागल्भ्यं प्रश्रयः शीलं सह ओजो बलं भगः ।**
**गाम्भीर्यं स्थैर्यमास्तिक्यं कीर्तिर्मानोऽनहङ्कृतिः ।।**
**एते चान्ये च भगवन् नित्या यत्र महागुणाः ।**
**प्रार्थ्या महत्त्वमिच्छद्भिर्न वियन्ति स्म कर्हिचित् ।।**

(श्रीमद्भा० १ । १६ । २६-२९)

'हे भगवन् ! त्या परमेश्वराच्या ठिकाणी सत्य, पावित्र्य, दया, क्षमा, त्याग; संतोष, सरलता, शम, दम तप, समता, तितिक्षा, उपरति,

शास्त्रविचार, ज्ञान वैराग्य, ऐश्वर्य, शौर्य, तेज, पराक्रम, स्मृती, स्वातंत्र्य, कौशल्य, कांती, धैर्य, कोमलता, निर्भीकता, विनय, शील, साहस, उत्साह, मनोबल, सौभाग्य, गांभीर्य, स्थैर्य, आस्तिक्य, कीर्ती, गौरव आणि निरहंकारिता - हे एकोणचाळीस अप्राकृत गुण तसेच मोठमोठया महत्त्वाकांक्षी लोकांकडून इच्छिलेले आणखीही महान गुण त्यांची सेवा करण्यासाठी सदैव निवास करतात. एका क्षणासाठी सूद्धा ते त्यांच्यापासून निराळे होत नाहीत.

शास्त्रांत भगवंतांचे आणखीही अनेक गुण सांगितले आहेत; परंतु ते अनंत असल्यामुळे त्या सर्वांचे वर्णन करणे शक्य नाही. हे सगळे अप्राकृत गुण भगवंतांच्या ठिकाणी अत्यंत आणि पूर्णरूपात आहेत. संपूर्ण जगातील प्राणिमात्रांच्या हृदयात असणारे दया व प्रेम एकत्र केले तरी सुद्धा त्या अपार दया आणि प्रेमाच्या समुद्रातील एका थेंबाची देखील तुलना करता येणे शक्य नाही. अशाच प्रकारे अनंत ब्रह्मांडातील सर्व गुणसमूहांना एकत्र करून सुद्धा त्या गुणसागरातील एका थेंबाची देखील सर येणे शक्य नाही, कारण की, अनंत ब्रह्मांड, परमेश्वराच्या संकल्पातील कोण्या एका अंशात स्थित आहे. त्या दिव्य चिन्मय परमेश्वराचे निर्गुण-निराकार रूपच सगुण निराकाराच्या स्वरूपात परिणत होते; म्हणून हे सर्व गुण दिव्य आणि चिन्मय आहेत. ह्या दिव्य चिन्मय गुणांच्या एका अंशाचे प्रतिबिंबच संपूर्ण ब्रह्मांडातील अनंत गुणांच्या रूपाने भासमान होत असते. म्हणून विश्वातील सर्व गुण परमेश्वराच्या गुणांतील एका थेंबाचीही बरोबरी करू शकत नाहीत.

त्या सगुण-साकार स्वरूपाचे दोन प्रकार आहेत - एक म्हणजे मायाविशिष्ट आणि दुसरा मायातीत. जे मायातीत रूप आहे, त्यावर सत्त्व, रज, तम - ह्या तीन गुणांचा अत्यंत अभाव आहे, म्हणून त्या परमात्म्याचे गुण, स्वरूप, प्रभाव इत्यादी सर्व काही चिन्मय आहे; परंतु ते विश्वात अवतार घेतल्यानंतर सर्वांना

दिसू लागते, ते भगवंतांचे मायाविशिष्ट रूप आहे * खरे मायास्वरूप सर्वांनाच दिसत नाही. कारण सर्वजण त्याचे अधिकारी नसल्यामुळे भगवंत स्वत:वर मायेचा पडदा घालून स्थित होतात. गीतेत भगवंतांनी स्वत:च म्हटले आहे -

**नाहं प्रकाशः सर्वस्य योगमायासमावृतः ।**
**मूढोऽयं नाभिजानाति लोको मामजमव्ययम् ।।**

(७ । २५)

'आपल्या योगमायेने झाकलेला मी सर्वांनाच दिसू शकत नाही; म्हणून हे अज्ञानी लोक, अजन्मा अविनाशी अशा मज परमेश्वराला जाणत नाहीत म्हणजेच मला जन्म-मृत्यू असलेला, असे समजतात.'

परंतु भगवंतांच्या तत्त्वरहस्याला जाणणारा जो भक्त आहे, त्याला आपला पडदा बाजूला करून खरे आणि मायातीत असे रूप दाखवून देतात, की ज्याचे दर्शन घडल्यामुळे मनुष्य कृतकृत्य होऊन जातो.'

खरे पाहता परमात्मा ईश्वरांचा देखील ईश्वर, अज आणि अविनाशी आहे, त्यांचा जन्म किंवा मृत्यू होत नाही. ते तर जगाच्या कल्याणासाठी प्रकट होतात आणि गुप्त होतात, किंवा असे म्हणा की, त्यांचे प्रकटीकरण आणि तिरोभाव होत असतो. जो मनुष्य त्या परमेश्वराच्या जन्माचे उपरनिर्दिष्ट दिव्यत्व आणि अलौकिकत्व तत्त्वत: जाणतो, तो परमेश्वराला प्राप्त होतो. (गीता ४ । ९)

---

* गीतेत भगवंत म्हणतात -

अजोऽपि सन्नव्ययात्मा भूतानामीश्वरोऽपि सन् ।
प्रकृतिं स्वामधिष्ठाय सम्भवाम्यात्ममायया ॥ (४ । ६)

'मी अजन्मा आणि अविनाशीस्वरूप असून सुद्धा, तसेच समस्त प्राणिमात्रांचा ईश्वर असताना सुद्धा आपल्या प्रकृतीला आधीन करून आपल्या योगमायेने प्रकट होतो.'

भगवंतांचा प्रभाव देखील अतिशय अप्रमेय आणि अलौकिक आहे. भगवंतांच्या ठिकाणी संपूर्ण बल, ऐश्वर्य, तेज, शक्ती, पराक्रम, प्रताप, सामर्थ्य, विभूती, महिमा, कांती, सर्वज्ञता, सर्वकारणता, सर्वाधारता, सर्वव्यापकता, सर्व नियंतृता, सर्वेश्वरता, सर्वांतर्यामिता, इत्यादी अनंत, अपार आणि विलक्षण प्रभाव आहे. ज्याप्रमाणे सूर्योदयामुळे संपूर्ण अंधाराचा अत्यंत अभाव होतो त्याचप्रमाणे परमेश्वराच्या स्वरूपाच्या स्मरणाच्या आणि ध्यानाच्या प्रभावाने संपूर्ण दुर्गुण, दुराचार, दुर्व्यसन, आलस्य, प्रमाद इत्यादी सर्व विकारांचा आणि दुःखदोषांचा संपूर्णपणे अभाव होतो तसेच मनुष्य सदगुण-सदाचारसंपन्न होऊन जन्ममृत्यूरूप संसार-सागरातून तरून जाऊन सहजपणे परमात्म्याला प्राप्त होतो. परमात्मा स्वतः अनंत आणि अमेय आहे. त्याच्या केवळ संकल्पामुळे अनंत ब्रह्मांडांची उत्पत्ती, स्थिती आणि लय सहजपणे होत असतात, त्याच्या कृपाकटाक्षानेच लक्षावधी कोट्यावधी प्राणिमात्रांचा एका क्षणात उद्धार होऊ शकतो. जो अशक्याला शक्य आणि शक्याला अशक्य करण्यात समर्थ आहे, जो अचेतनाला चेतन आणि चेतनाला अचेत करू शकतो आणि जो मशकाला ब्रह्मदेव आणि ब्रह्मदेवाला मशक करण्यास समर्थ आहे, त्या अचिन्त्य - अनंत - प्रभावशाली परमात्म्याच्या प्रभावाचे वर्णन संपूर्णपणे करणे शक्य नाही. सर्व ब्रह्मांडांमध्ये ज्या काही विभूती, बल, ऐश्वर्य इत्यादी प्रभावशाली तेजस्वी पदार्थ आहेत ते सर्व मिळून भगवंतांच्या प्रभावातील एका अंशात आहेत.* त्या भगवंतांच्या तत्त्व-रहस्याला जो मनुष्य जाणतो, तो त्याच क्षणी त्यांना प्राप्त होतो.

म्हणून भगवंतांच्या तत्त्व-रहस्याला जाणण्यासाठी गुण-प्रभावासहित त्यांच्या स्वरूपाचे निष्कामभावाने श्रद्धा-प्रेमपूर्वक सदैव

---

* गीतेत देखील भगवंतांनी म्हटले आहे -

अखण्डित ध्यान केले पाहिजे.

*****

---

यद् यद् विभूतिमत् सत्त्वं श्रीमदूर्जितमेव वा ।
तत्तदेवावगच्छ त्वं मम तेजोंऽशसंभवम् ॥
अथवा बहुनैतेन किं ज्ञातेन तवार्जुन ।
विष्टभ्याहमिदं कृत्स्नमेकांशेन स्थितो जगत् ॥

(१० । ४१-४२)

'जी जी कोणतीही विभूतियुक्त म्हणजे ऐश्वर्ययुक्त, कान्तियुक्त आणि शक्तियुक्त वस्तू आहे ती प्रत्येक वस्तू माझ्या तेजाच्या अंशातून निर्माण झालेली आहे असे तू जाण. किंवा हे अर्जुना ! हे बरेचसे जाणण्याचा तुला काय उपयोग? मी ह्या संपूर्ण जगाला आपल्या योगशक्तीच्या केवळ एकाच अंशाने धारण करून स्थित आहे.'

# भगवन्नामजपाचा प्रभाव

ह्या मनुष्य-जन्माचे सार्थक भगवत्प्राप्तीतच आहे. भगवंतांच्या ठिकाणी प्रेम असल्यामुळे भगवंतांची प्राप्ती होतेच - ही गोष्ट गीता, रामायण, भागवत इत्यादी ग्रंथांमध्ये जागोजागी सांगितली आहे. गीतेत भगवान श्रीकृष्ण म्हणतात -

**भक्त्या त्वनन्यया शक्य अहमेवंविधोऽर्जुन ।**
**ज्ञातुं द्रष्टुं च तत्त्वेन प्रवेष्टुं च परंतप ।।**

(११ । ५४)

'हे अर्जुना, अनन्य भक्तिमुळेच तर अशा प्रकारचे स्वरूप असलेला मी प्रत्यक्ष दिसू शकतो, तत्त्वाने जाणला जाऊ शकतो तसेच प्रवेश म्हणजे एकत्त्वभावाने देखील प्राप्त केला जाऊ शकतो.'

श्रीरामचरित मानसात श्रीशंकरांचे वचन आहे -

**हरि व्यापक सर्वत्र समाना । प्रेम ते प्रगट हो हिं मै जाना ।।**

(बाल० १८५ । ३)

श्रीमद्भावतात श्रीकपिलदेव म्हणतात -

**वासुदेवे भगवति भक्तियोगः प्रयोजितः ।**
**जनयत्याशु वैराग्यं ज्ञानं यद् ब्रह्मदर्शनम् ।।**

(३ । ३२ । २३)

'भगवान वासुदेवांच्या ठिकाणी केलेला भक्तियोग त्वरितच संसारापासून वैराग्य आणि ब्रह्मसाक्षात्काररूपी यथार्थ ज्ञानाची प्राप्ती करून देतो.'

एवढेच नव्हे तर, स्वतः भगवंतांनी उद्धवाला म्हटले आहे -

**न साधयति मां योगो न सांख्यं धर्म उद्धव ।**
**न स्वाध्यायस्तपस्त्यागो यथा भक्तिर्ममोर्जिता ।।**

**भक्त्याहमेकया ग्राह्यः श्रद्धयाऽऽत्मा प्रियः सताम् ।**
**भक्तिः पुनाति मन्निष्ठा श्वपाकानपि सम्भवात् ।।**

(श्रीमद्भा० ११ । १४ । २०-२१)

'हे उद्धवा ! योगसाधना, ज्ञान-विज्ञान, धर्मानुष्ठान, जप-पाठ आणि तप-त्याग - मला प्राप्त होण्यासाठी एवढे समर्थ नाहीत की जेवढी दिवसेंदिवस वाढत जाणारी अनन्य प्रेमाने युक्त अशी माझी भक्ती आहे. मी सत्पुरुषांचा प्रियतम आत्मा आहे. मी फक्त अनन्य श्रद्धा-भक्तीनेच प्राप्त होतो. माझी अनन्य भक्ती जे जन्मापासून चांडाल आहेत अशा लोकांना सुद्धा पवित्र करते.'

अशाप्रकारे प्रेमानेच भगवंतांची प्राप्ती सांगितली आहे. ते प्रेम प्राप्त होते सत्संगानेच.

**बिनु सतसंग न हरिकथा तेहि बिनु मोह न भाग ।**
**मोह गएँ बिनु रामपद होइ न दृढ़ अनुराग ।।**

(रा० च० मा० उत्तर० ६१)

तसेच ज्याप्रमाणे विषयांचे चिंतन केल्यामुळे विषयांच्याच ठिकाणी प्रेम निर्माण होते, त्याप्रमाणे भगवंतांचे चिंतन केल्यामुळे भगवंतांच्या ठिकाणी प्रेम निर्माण होते. भगवंतांच्या ठिकाणी अनन्य आणि विशुद्ध प्रेम निर्माण झाल्यावर भगवंतांच्या स्वरूपाचे चिंतन आणि भगवंतांच्या नामाचा जप आपोआपच होऊ लागतो. मग तो भगवंतांना विसरूच शकत नाही. गोपिकांचे भगवंतांवर अनन्य प्रेम होते. म्हणून त्या भगवंतांना कधीच विसरत नव्हत्या. श्रीमद्भागवतात सांगितले आहे -

**या दोहनेऽवहनने मथनोपलेप-**
**प्रेङ्खेङ्खनार्भरुदितोक्षणमार्जनादौ ।**
**गायन्ति चैनमनुरक्तधियोऽश्रुकण्ठ्यो**
**धन्या व्रजस्त्रिय उरुक्रमचित्तयानाः ।।**

(१० । ४४ । १५)

'ज्या गोपिका गाईंचे दूध काढताना, धान्य इत्यादी कांडताना, दही घुसळताना, अंगण सारवताना, बाळांना पाळण्यात झोके देताना, रडणाऱ्या तान्ह्या बालकांना अंगाई गाताना, घरात पाणी शिंपडताना आणि केर काढणे इत्यादी कामे करत असताना प्रेमाने परिपूर्ण अशा अंत:करणाने अश्रूपूर्ण नयनांनी सद्गदित वाणीने श्रीकृष्णांच्या नामाचे आणि गुणांचे गायन करत असतात - अशाप्रकारे नेहमी श्रीकृष्णांच्या ठिकाणीच चित्तलय असणाऱ्या त्या व्रजवासिनी गोपिका धन्य आहेत.'

ज्या प्रकारे भगवच्चिंतनातून भगवत्प्रेम प्राप्त होत असते, त्याचप्रमाणे केवळ भगवन्नामजपानेसुद्धा भगवंतांच्या ठिकाणी प्रेम निर्माण होते. तुलसीदासजी म्हणतात -

**सुमिरिअ नाम रूप बिनु देखें । आवत हृदयँ सनेह बिसेषें ।।**

(रा० च० मा० बाल० २१ । ३)

तुलसीदासांनी तर भगवंतापेक्षासुद्धा अधिक भगवंतांच्या नामाचा महिमा गायिला आहे.

**राम भगत हित नर तनु धारी । सहि संकट किए साधु सुखारी ।।**
**नामु सप्रेम जपत अनयासा । भगत होहिं मुद मंगल बासा ।।**
**राम एक तापस तिय तारी । नाम कोटि खल कुमति सुधारी ।।**
**भंजेउ राम आपु भवचापू । भव भय भंजन नाम प्रतापू ।।**
**दंडक बनु प्रभु कीन्ह सुहावन । जन मन अमित नाम किए पावन ।।**
**निसिचर निकर दले रघुनंदन । नामु सकल कलि कलुष निकंदन ।।**
**सबरी गीध सुसेवकन्हि सुगति दीन्हि रघुनाथ ।**
**नाम उधारे अमित खल बेद बिदित गुन गाथ ।।**

(रा० च० मा० बाल० २४ । १-४; २४)

श्री तुलसीदासांनी आपल्या ग्रंथांमध्ये 'राम'नामाचा विशेष महिमा सांगितला आहे. अशाच प्रकारे वेद आणि योगदर्शनात 'ॐ' काराचा, भागवत इत्यादींमध्ये कृष्णाचा, गीतेमध्ये 'ॐ',

'तत्', 'सत्' नामांचा * कुराणात 'अल्लाह', 'खुदा' यांचा, बायबलमध्ये 'गॉड' चा, जैन ग्रंथांमध्ये 'अर्हन्त' आणि 'ॐ' यांचा, आर्य समाजाच्या ग्रंथांमध्ये 'ॐ' काराचा विशेष महिमा सांगितला आहे. अशाप्रकारे इतर सर्व संप्रदायांच्या महानुभावांनी आपापल्या इष्ट देवाच्या नामाचा विशेष महिमा सांगितला आहे. म्हणून असे जाणले पाहिजे की, राम, कृष्ण, गोविंद, वासुदेव, हरी, विष्णु, शिव, ॐ, तत्, सत्, अल्लाह, खुदा, गॉड, इत्यादी परमेश्वराच्या ज्या नामात ज्या मनुष्याची आवड, श्रद्धा, विश्वास असेल त्याच्या दृष्टीने तेच सर्वात उत्तम आहे. म्हणून त्याने त्याच नामाचा श्रद्धा, प्रेम आणि निष्काम भावाने तत्परतापूर्वक जप करणे योग्य आहे.

वाचेने मोठ्याने उच्चारण करून जो जप केला जातो त्याला 'वाचिक' जप म्हणतात. त्यापेक्षा तो उपांशु जप श्रेष्ठ आहे की जो ओठ आणि जिभेने उच्चारण केला जाणारा दुसऱ्यांना ऐकू जात नाही, अशा मंद स्वरात हळूहळू उच्चारण करून केला जातो. परंतु त्यापेक्षासुद्धा अधिक श्रेष्ठ मानसिक जप आहे.

श्रीमनुने तर यज्ञापेक्षासुद्धा नामजपाचा महिमा फारच मोठा आहे असे दर्शविले आहे -

**विधियज्ञाज्जपयज्ञो विशिष्टो दशभिर्गुणैः ।**
**उपांशुः स्याच्छतगुणः साहस्रो मानसः स्मृत : ।।**

(मनु० २ । ८५)

'विधीयज्ञ (अग्निहोत्र इत्यादी) पेक्षा उच्चारण करून केला जाणारा जपयज्ञ दहा पटींनी श्रेष्ठ आहे आणि उपांशु जप शंभर पटींनी

---

* ॐ तत्सदिति निर्देशो ब्रह्मणस्त्रिविधः स्मृतः ।
ब्राह्मणास्तेन वेदाश्च यज्ञाश्च विहिताः पुरा ॥ (गीता १७ । २३)

'ॐ' तत्, सत् असे हे तीन प्रकारचे सच्चिदानंदघन ब्रह्माचे नाम सांगितले आहे. त्यापासूनच सृष्टीच्या आरंभी ब्राह्मण आणि वेद तसेच यज्ञ इत्यादी रचले गेले.'

श्रेष्ठ आहे तसेच मानस जप हजार पटींनी श्रेष्ठ आहे.'

गीतेत भगवंतांनी यज्ञ या नावाने अनेक साधने सांगितली आहेत. त्या साधनांमध्ये जपयज्ञाला आपले स्वरूप म्हणजेच साध्य आहे असे सांगितले आहे - **'यज्ञानां जपयज्ञोऽस्मि'** (गीता १० । २५ चा तिसरा चरण) 'सर्व प्रकारच्या यज्ञांमध्ये जपयज्ञ मीच आहे.'

जो नामजप मनापासून - मन लावून केला जातो तो मानसिक जप होय. मानसिक जपाचे बरेच प्रकार आहेत. जसे

(१) जिच्यावर माणसाचे विशेष प्रेम असते ती वस्तू स्मरण न करतासुद्धा आपोआप आठवते आणि तिला विसरण्याचा प्रयत्न केल्यावरसुद्धा तिचा विसर पडत नाही. अशाप्रकारे मुद्दामच भगवंतांच्या नामाची आठवण नेहमी होणे - हा सर्वश्रेष्ठ मानसिक जप आहे.

(२) ज्याप्रमाणे मनात भगवंतांचे स्वरूप, गुण, प्रभाव, चरित्र, लीला, इत्यादींचे स्मरण होते त्याप्रमाणेच भगवंतांच्या नामाची मनात वारंवार स्मृती होणे - हा सुद्धा मानसिक जप आहे.

(३) भिंतीवर लिहिलेल्या अक्षरांप्रमाणे भगवंतांच्या ललाटावर भगवंतांचे नाम लिहिले आहे असे समजून मनानेच ते वारंवार वाचणे - हासुद्धा मानसिक जप आहे.

(४) हृदय, कंठ, भुवया इत्यादी ठिकाणी नाडीच्या ठोक्यांबरोबर नामजपाची भावना केल्यामुळे त्यापासून नामजप होत आहे असे जाणवते, मनाने त्याचा वारंवार अनुभव करणे - हासुद्धा मानसिक जप आहे.

(५) रात्रीच्या वेळी झोपताना स्वाभाविकपणेच कानात एक प्रकारचा ध्वनी ऐकू येत रहातो. त्यात राम, शिव, ॐ इत्यादी अल्पाक्षरांतून भगवन्नामाची भावना उत्पन्न केल्यामुळे ते नाम स्वत:च ऐकू येते. याचा दृढ अभ्यास झाल्यावर चालताना-

फिरताना, उठता-बसताना, झोपेत-जागेपणीसुद्धा मनानेच ते नाम ऐकू येणे - हा सुद्धा एक प्रकारचा मानसिक जपच आहे.

याशिवाय जीभ आणि ओठ बंद करून श्वासोच्छ्वासाद्वारा (श्वास आत घेताना आणि बाहेर सोडताना) जो नामजपाचा अभ्यास केला जातो, त्यात सवय झाल्यानंतर नामाचे उच्चारण कंठातून सहजपणे होत रहाते. श्वासावाटे होणारा हा जप उपांशु जपापेक्षा श्रेष्ठ आहे, कारण की हा मरणकालापर्यंत वाचा आणि नाडीची गती बंद झाल्यावर देखील होऊ शकतो. परंतु याच्याबरोबर मनाला जोडून दिले तर त्यावेळी हा देखील मानसिक जपाच्या गणनेत समाविष्ट होऊन जातो.

भगवन्नामजपाबरोबर त्या नामाचा अर्थ जो नामी-भगवंत आहे, त्यांचे स्मरण ठेवल्यामुळे तो जप अधिक महत्त्वपूर्ण आणि कल्याणकारक होतो. योगदर्शनात सांगितले आहे -

**तस्य वाचक: प्रणव: ।** (१ । २७)

'त्या परमेश्वराचे वाचक (नाम) प्रणव (ॐकार) आहे'

**तज्जपस्तदर्थभावनम् ।** (१ । २८)

'त्या ॐकाराचा जप आणि त्याचे अर्थस्वरूप अशा परमेश्वराचे चिंतन केले पाहिजे.'

**तत: प्रत्यक्चेतनाधिगमोऽप्यन्तरायाभावश्च ।**

(१ । २९)

'सांगितलेल्या साधनांनी विघ्नांचा अभाव होतो आणि परमेश्वराच्या स्वरूपाची सुद्धा प्राप्ती होते.'

गीतेत भगवंतसुद्धा म्हणतात -

**ओमित्येकाक्षरं ब्रह्म व्याहरन्मामनुस्मरन् ।**
**य: प्रयाति त्यजन्देहं स याति परमां गतिम् ।।**

(८ । १३)

'जो पुरुष 'ॐ' अशा एकाच अक्षररूपी ब्रह्माचे उच्चारण

करत असताना आणि त्याच्या अर्थाचे स्वरूप अशा निर्गुण ब्रह्म असलेल्या माझे चिंतन करत असताना शरीराचा त्याग करतो, तो परम गतीला प्राप्त होतो.'

नामजप जर अत्यंत श्रद्धा आणि प्रेमपूर्वक केला गेला तर त्याचा महिमा कोणीही गाऊच शकत नाही; कारण की श्रद्धा-प्रेम असल्यामुळे तर जप अखंडित आणि आपोआप होऊ लागतो. मग जर कोणत्याही प्रकारची कामना न करता, निस्वार्थ भावाने केवळ कर्तव्य समजून नामजप केला गेला, तर त्याच्यासारखे दुसरे कोणतेही साधन नाही. अशाप्रकारे नामजप करणाऱ्या साधकाला तर त्वरित भगवत्प्राप्ती होते. उच्च प्रतीचे विशुद्ध प्रेम निष्काम भाव झाल्यावरच होते. यालाच अनन्य विशुद्ध परमप्रेम म्हणतात, की जे प्राप्त झाल्यावर भगवत्साक्षात्कार होण्यास एका क्षणाचा देखील विलंब होऊ शकत नाही.

परंतु हे लक्षात ठेवले पाहिजे की, त्या खऱ्या प्रेमात दिखाऊपणा कधीच रहात नाही. खरा प्रेमी 'मी प्रेमी आहे' असे सांगत नाही किंवा दुसऱ्यांकडूनही सांगत नाही. उलट स्वतःच तसा होतो. जो मनुष्य या जगात 'मी प्रेमी आहे' असा प्रचार करतो तो खरा विशुद्ध प्रेमी नाही; कारण की मान मरातब प्रतिष्ठा आणि कांचन-कामिनी, भोग-आराम यांची इच्छा करणारा माणूसच प्रेमाचा देखावा करतो. परंतु प्रेम न करण्यापेक्षा तर असे सकाम प्रेम करणेसुद्धा चांगले आहे' कारण की कधीतरी पुढे तेच प्रेम सकामाचे निष्काम होऊ शकते. परंतु लक्षात ठेवले पाहिजे की निष्काम आणि अनन्य प्रेम निर्माण झाल्यावरच भगवंत आपले दर्शन देण्यासाठी विशेष प्रकारे बांधले जातात (गीता ११ । ५४). जर भगवंत निष्काम प्रेम नसताना सुद्धा अनन्य भक्तीने दर्शन देतील तर हे त्यांचे विशेष औदार्य आहे.

रामचरित मानसात भगवंतांनी स्वतः निष्काम भजन करणाऱ्या

भक्ताची वैशिष्ट्ये सांगितली आहेत -

**बचन कर्म मन मोरि गति भजनु करहिं निःकाम ।**
**तिन्ह के हृदय कमल महुँ करउँ सदा बिश्राम ।।**

(अरण्य० १६)

जे नामोच्चारण एकट्याने किंवा अनेक व्यक्ती मिळून बाजाच्या पेटीबरोबर किंवा त्याशिवाय, उंच स्वरात सामुहिक रूपाने केले जाते, त्याला 'कीर्तन' असे म्हणतात. त्या नामसंकिर्तनाचा महिमादेखील अपार आहे. परंतु त्यात देखील श्रद्धा-प्रेम यांचेच प्राधान्य आहे. जेवढे जास्त श्रद्धा-प्रेम आणि निष्काम भाव असतील तेवढे ते अधिक मौल्यवान आहे. श्रीनारद, श्रीतुलसीदास, श्रीसूरदास, श्रीनरसिंह मेहता, श्रीगौरांग महाप्रभू आणि मीराबाई इत्यादी बरेचसे भक्त कीर्तनप्रेमी म्हणून मानले जातात.

परंतु श्रीमद्भागवतात तर इथपर्यंत सांगितले आहे-

**अज्ञानादथवा ज्ञानादुत्तमश्लोकनाम यत् ।**
**संकीर्तितमघं पुंसो दहेदेधो यथानलः ।।**

(६ । २ । १८)

'ज्याप्रमाणे अग्नि इंधनाला जाळून टाकतो त्याप्रमाणे पुण्य-किर्ती श्रीहरीच्या नामाचे संकीर्तन जाणता किंवा अजाणता केले गेले तर ते माणसाच्या संपूर्ण पापांचे भस्म करून टाकते.'

श्रीशुक्राचार्यांनी भगवंतांना म्हटले आहे -

**मन्त्रतस्तन्त्रतश्छिद्रं देशकालार्हवस्तुतः ।**
**सर्वं करोति निश्छिद्रं नामसंकीर्तनं तव ।।**

(श्रीमद्भा० ८ । २३ । १६)

'हे प्रभो मंत्रांतील अनुष्ठान पद्धतीच्या देश, काल, पात्र आणि वस्तूतील सर्व चुका आपल्या नामसंकीर्तनाने सुधारल्या जातात. आपले नाम सर्व उणिवांना पूर्ण करून टाकते.'

एवढेच नव्हे, भगवन्नामजपाचा फार मोठा प्रभाव आहे. नामजपाच्या प्रभावामुळे तर स्वत: भगवंतच त्या जपकर्त्याच्या आधीन होतात -

**सुमिरि पवनसुत पावन नामू । अपने बस करि राखे रामू ।।**

(रा० च० मा० बाल० २६ । ३)

भक्त हनुमंतांची भगवंतांच्या नावावर अत्यंत निष्ठा होती. अध्यात्मरामायणात समुद्रोल्लंघनाच्या वेळी तो म्हणतो -

**प्राणप्रयाणसमये यस्य नाम सकृत् स्मरन् ।।**
**नरस्तीर्त्वा भवाम्भोधिमपारं याति तत्पदम् ।**

(सुन्दर० १ । ४-५)

'प्राण बाहेर पडण्याच्या वेळी ज्या भगवंतांच्या नामाचे एकदाच स्मरण केल्यामुळे या अनंतसंसारसागरातून तरून जाऊन मनुष्य त्यांच्या परमधामाला निघून जातो.'

राज्याभिषेक झाल्यानंतर जेव्हा श्रीरामचंद्रप्रभू हनुमंताच्या भक्तीने प्रसन्न होऊन त्याला वर मागावयास सांगतात तेव्हा हनुमंत अत्यंत आनंदित होऊन हाच वर मागतो -

**त्वन्नाम स्मरतो राम न तृप्यति मनो मम ।।**
**अतस्त्वन्नाम सततं स्मरन् स्थास्यामि भूतले ।**

(अध्यात्म० युद्ध० १६ । १२-१३)

'हे श्रीरामा आपले नामस्मरण करताना माझे मन तृप्त होत नाही; म्हणून सदैव मी आपले नामस्मरण करतच या पृथ्वीवर रहावे.'

भगवान श्रीरामांनी त्याच्या इच्छेनुसार त्याला वर दिला. श्रीमद्भागवतात देखील म्हटले आहे -

**यन्नामधेयं म्रियमाण आतुर:**
**पतन् स्खलन् वा विवशो गृणन् पुमान् ।**
**विमुक्तकर्मार्गल उत्तमां गतिं**

**प्राप्नोति यक्ष्यन्ति न तं कलौ जनाः ।।**

(१२ । ३ । ४४)

'माणसाने जर मरणकाली, रोगी अवस्थेत, पडताना किंवा घसरताना विवश होऊन भगवंतांच्या नामाचे उच्चारण केले तर तो सर्व कर्मबंधनातून सुटून उत्तम गतीला प्राप्त होतो. एवढे असून सुद्धा या भयंकर कलियुगात माणसे त्या भगवंतांची उपासना तत्परतेने करत नाहीत.'

एवढेच नव्हे तर मनुष्य कितीही का पापी असेना नामजपाच्या प्रभावाने त्याची सगळी पापे नष्ट होतात आणि त्याचे कल्याण होते.

**अपतु अजामिलु गजु गनिकाऊ । भए मुकुत हरि नाम प्रभाऊ ।।**
**चहुँ जुग तीनि काल तिहुँ लोका । भए नाम जपि जीव बिसोका ।।**
**नाम कामतरु काल कराला । सुमिरत समन सकल जग जाला।।**

(रा० च० मा० बाल० २६ । ४; २७ । १,३)

कोण्या एका कविनेसुद्धा म्हटले आहे -

**जबहिं नाम हिरदै धर्‌यो भयो पापको नास ।**
**मानो चिनगी आगकी परी पुराने घास ।।**

गीतेतसुद्धा भगवंत म्हणतात -

**अपि चेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक् ।**
**साधुरेव स मन्तव्यः सम्यग्व्यवसितो हि सः ।।**
**क्षिप्रं भवति धर्मात्मा शश्वच्छान्तिं निगच्छति ।**
**कौन्तेय प्रति जानीहि न मे भक्तः प्रणश्यति ।।**

(९ । ३०-३१)

'जर एखादा कोणी अत्यंत दुराचारीसुद्धा अनन्य भावाने माझा भक्त होऊन मला भजतो तो संत मानण्यासच योग्य आहे; कारण की तो यथार्थ निश्चयी आहे. म्हणजेच त्याने उत्तम प्रकारे निश्चय केला आहे की परमेश्वराच्या भजनासारखे दुसरे काहीही

नाही. तो लवकरच धर्मात्मा होतो आणि सदैव असणाऱ्या शांतीला प्राप्त होतो. हे अर्जुना ! तू निश्चयपूर्वक हे सत्य जाणून घे की माझा भक्त कधीही नष्ट होत नाही.'

श्रीमद्भागवतात भगवंतांच्या पार्षदांचे वचन आहे -

**सर्वेषामप्यघवतामिदमेव सुनिष्कृतम् ।**
**नामव्याहरणं विष्णोर्यतस्तद्विषया मतिः ।।**

(६ । २ । १०)

'समस्त पापी लोकांसाठी सर्वात मोठे एवढेच प्रायश्चित्त आहे की भगवंतांच्या नामाचे उच्चारण केले जावे. कारण की भगवन्नामाच्या उच्चारणामुळे मनुष्याची बुद्धी भगवंतांचे गुण, लीला आणि स्वरूपात रममाण होते आणि स्वतः भगवंतांची आत्मीय बुद्धी त्याच्या ठिकाणी निर्माण होते.'

श्रीशुकदेव परीक्षिताला म्हणतात -

**म्रियमाणो हरेर्नाम गृणन् पुत्रोपचारितम् ।**
**अजामिलोऽप्यगाद् धाम किं पुनः श्रद्धया गृणन् ।।**

(श्रीमद्भा० ६ । २ । ४९)

'अजामिळासारख्या पाप्याने मरणकाळी पुत्राच्या निमित्ताने भगवंतांच्या नामाचे उच्चारण केले होते. परंतु त्याला देखील परमधामाची प्राप्ति झाली; मग जे लोक श्रद्धा-विश्वासपूर्वक भगवन्नामाचे उच्चारण करतात त्यांची तर गोष्टच काय सांगावी.

श्रीसूतांनी म्हटले आहे -

**पतितःस्खलितश्चार्तः क्षुत्त्वा वा विवशो ब्रुवन् ।**
**हरये नम इत्युच्चैर्मुच्यते सर्वपातकात् ।।**

(श्रीमद्भा० १२ । १२ । ४६)

'जो मनुष्य पडता-धडताना, घसरताना, दुःख भोगताना किंवा शिंकताना अगतिकपणे जरी उंच स्वरात म्हणतो - **'हरये नमः'** तो सर्व पापांपासून मुक्त होतो.'

श्रीनारदपुराणात श्रीसनक नारदांना म्हणतात -

**हरे केशव गोविन्द वासुदेव जगन्मय ।**
**इतीरयन्ति ये नित्यं न हि तान् बाधते कलिः ।।**

(पूर्व० ४१ । ९९-१००)

'जे लोक दररोज हे हरे ! हे केशव ! हे गोविंद ! हे वासुदेव ! हे जगन्मय ! इत्यादी भगवंतांच्या नामांचे उच्चारण करतात त्यांना कलियुग त्रास देत नाही.'

आणखीही म्हणतात -

**अहो चित्रमहो चित्रमहो चित्रमिदं द्विज ।**
**हरिनाम्नि स्थिते लोकः संसारे परिवर्तते ।।**

(नारद० पूर्व० ३४ । ४८)

'हे ब्रह्मन् ! ही मोठी आश्चर्याची गोष्ट आहे, मोठी अद्भुत गोष्ट आहे आणि मोठी विचित्र गोष्ट आहे की भगवान विष्णूंच्या नामाचे अस्तित्व असतानासुद्धा लोक जन्ममृत्युरूपी संसारात चकरा मारत असतात.'

**स्वपन् भुञ्जन् व्रजंस्तिष्ठन्नुत्तिष्ठंश्च वदंस्तथा ।**
**चिन्तयेद्यो हरेर्नाम तस्मै नित्यं नमो नमः ।।**

(नारद० पूर्व० ३९ । ७)

'जो झोपताना, खाताना, चालताना, बसताना, उठताना आणि बोलताना सुद्धा भगवान विष्णूंच्या नावाचे चिंतन करतो त्याला सदैव वारंवार नमस्कार असो.'

**हरेर्नामैव नामैव नामैव मम जीवनम् ।**
**कलौ नास्त्येव नास्त्येव नास्त्येव गतिरन्यथा ।।**

(नारद० पूर्व० ४१ । ११५)

'भगवान विष्णूंचे नामच, नामच, नाम हेच माझे जीवन आहे. कलियुगात दुसरी कोणतीच गती नाही, नाहीच नाही.'

श्रुती देखील म्हणते -

**एतद्ध्येवाक्षरं ब्रह्म एतद्ध्येवाक्षरं परम् ।**

**एतद्ध्येवाक्षरं ज्ञात्वा यो यदिच्छति तस्य तत् ।।**

(कठ० १ । २ । १६)

'हे अक्षर (ॐ) हे तर ब्रह्म आहेच आणि हे अक्षरच परब्रह्म आहे. म्हणून हे अक्षर जाणून जो ज्याची इच्छा करतो त्याला तेच प्राप्त होते.'

अशाप्रकारे शास्त्रांमध्ये ठिकठिकाणी नामाचा भरपूर महिमा गायलेला आहे. येथे तर थोडेसे सामान्य दिग्दर्शन केले गेले आहे. खरे पाहता नामाचा महिमा कोणीही गाऊच शकत नाही; कारण की गाणे तर वाचेनेच होत असते; परंतु वाचा मर्यादित आहे आणि भगवन्नामाचा महिमा अमर्याद आहे. म्हणून त्याचा महिमा मनुष्य कुठपर्यंत गाऊ शकेल ! असे म्हणणे देखील काही अयोग्य नाही की भगवंतांच्या नामाचा महिमा भगवंतसुद्धा गाऊ शकत नाही -

**कहौं कहाँ लगि नाम बड़ाई । रामु न सकहिं नाम गुन गाई ।।**

(रा० च० मा० बाल० २६ । ४)

म्हणून भगवंतांच्या ठिकाणी अत्यंत श्रेष्ठ असे प्रेम निर्माण होण्यासाठी आपण अनन्य, विशुद्ध, श्रद्धा-प्रेमपूर्वक मनाने, प्रत्येक वेळी भगवंतांच्या नामाचा जप करण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

*****

# भगवत्प्राप्तीचा सोपा उपाय - अनन्य शरणागती

केवळ एका भगवंतालाच सर्व प्रकारे शरण जाणे - हा सर्व जनांसाठी परमात्मप्राप्तीचा अगदी सोपा उपाय आहे. परंतु जे लोक ज्ञानयोग, कर्मयोग, अष्टांगयोग इत्यादी साधने करण्यास असमर्थ आहेत, त्यांच्यासाठी तर केवळ भगवंतांना शरण जाणे सर्व दृष्टींनी लाभदायक आहे, कारण की भगवंत अत्यंत प्रेमळ परममित्र आणि अकारण दया करणारे आहेत. ते आपल्या दासांच्या दोषांकडे कधी कटाक्ष टाकतच नाहीत. श्री भरत म्हणतात -

**जन अवगुन प्रभु मान न काऊ । दीन बंधु अति मृदुल सुभाऊ ।।**

(रा० च० मा० उत्तर० १ । ३)

म्हणून जो मनुष्य भगवंतांना शरण जातो त्याला भगवंत सर्वांपासून अभय देतात. स्वतः भगवंतांचे वचन आहे -

**सकृदेव प्रपन्नाय तवास्मीति च याचते ।**
**अभयं सर्वभूतेभ्यो ददाम्येतद् व्रतं मम ।।**

(वा० रा० युद्ध० १८ । ३३)

'जो मनुष्य 'मी आपला आहे' अशा भावनेने भावित होऊन केवळ एकदाच स्वतःला सर्व प्रकारे माझ्या ठिकाणी अर्पण करतो - उत्तम प्रकारे माझ्यावर भार टाकतो, खऱ्या भावनेने प्रार्थना करणाऱ्या त्या भक्ताला स्वीकारून मी त्याला संपूर्ण प्राण्यांपासून कायमच निर्भय करून टाकतो. हे माझे 'व्रत' आहे.'

मग कोणी कसाही का पापी असेना, भगवंत त्याचा कधीही त्याग करत नाहीत. रामचरित मानसात भगवंतांचे वाक्य आहे -

**कोटि बिप्र बध लागहिं जाहू । आएँ सरन तजउँ नहिं ताहू ।।**

(सुन्दर० ४४ । १)

म्हणून जो सर्व साधनांशिवाय आहे त्या मनुष्याच्या कल्याणासाठी तर भगवंतांना शरण जाणे हाच सोपा आणि सरळ उपाय आहे. भगवंतांनी गीतेतसुद्धा म्हटले आहे -

**मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः ।**
**स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यान्ति परां गतिम् ।।**

(९ । ३२)

'हे अर्जुना स्त्री, वैश्य, शूद्र तसेच पापयोनि, चांडाल इत्यादी जे कोणीही असोत, ते देखील मला शरण आल्यावर परमगतीला प्राप्त होतात.'

पाहिजे तर तो अगदी नीचातील नीच जातीचा का असेना, भगवंतांना शरण (भक्ती) गेल्यामुळे परमपदाला प्राप्त होतो. भगवंतांनी उद्धवाला म्हटले आहे -

**भक्त्याहमेकया ग्राह्यः श्रद्धयाऽऽत्मा प्रियः सताम् ।**
**भक्तिः पुनाति मन्निष्ठा श्वपाकानपि सम्भवात् ।।**

(श्रीमद्भा० ११ । १४ । २१)

'हे उद्धवा ! मी संतांचा परमप्रिय 'आत्मा' आहे. मी केवळ श्रद्धा-भक्तीनेच ताब्यात येऊ शकतो. माझी अनन्य भक्ती अशा लोकांना देखील पवित्र करते की जे जन्मानेच चांडाल आहेत.'

अशाप्रकारे जो शुभ आचरणाव्यतिरिक्त आहे, तो सुद्धा त्वरितच धर्मात्मा होऊन परमशांतीला प्राप्त होतो. भगवंत अर्जुनाला म्हणतात -

**अपि चेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक् ।**
**साधुरेव स मन्तव्यः सम्यग्व्यवसितो हि सः ।।**

(गीता ९ । ३०)

'जरी कोणी अत्यंत दुराचारीसुद्धा, अनन्य भावाने माझा भक्त होऊन मला भजतो, तो संत म्हणून मानण्यास योग्य आहे; कारण की तो यथार्थ निश्चय करणारा असा आहे. म्हणजेच त्याने उत्तम प्रकारे निश्चय

केला आहे की परमेश्वराच्या भजनासारखे दुसरे काहीही नाही.'

**क्षिप्रं भवति धर्मात्मा शश्वच्छान्तिं निगच्छति ।**
**कौन्तेय प्रति जानीहि न मे भक्तः प्रणश्यति ।।**

(गीता ९ । ३१)

'तो त्वरितच धर्मात्मा होतो आणि परमचिरशांतीला प्राप्त होतो. हे अर्जुना तू निश्चयपूर्वक हे सत्य जाण की माझ्या भक्ताचा विनाश होत नाही.'

मग जे उत्तम जातीचे आहेत आणि उत्तम आचरण करणारे आहेत त्यांचा उद्धार होईल यात सांगायचे ते काय.

म्हणून मनुष्याने त्या अकारण प्रेम करणाऱ्या आणि अत्यंत दयाळू अशा केवळ एकमेव भगवंतांना सर्व प्रकारांनी शरण गेले पाहिजे. सर्व प्रकारांनी शरण जाण्याचे स्वरूप गीतेमध्ये असे आढळते -

**मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ।**
**मामेवैष्यसि युक्त्वैवमात्मानं मत्परायणः ।।**

(९ । ३४)

'माझ्या ठिकाणी चित्तलय असलेला असा हो, माझा भक्त हो, माझे पूजन करणारा हो, मला नमस्कार कर. अशाप्रकारे आत्म्याला माझ्या ठिकाणी नियुक्त करून मत्परायण असलेला असा तू मलाच प्राप्त होशील.'

या श्लोकात भगवंतांनी शरणागतीचे चार प्रकार सांगितले आहेत. ते समजून घेतले पाहिजेत. आपल्याजवळ ही चार प्रमुख साधने आहेत - मन, बुद्धि, इंद्रिय आणि शरीर. **'मन्मना भव'** ने मनाला भगवंतांच्या ठिकाणी लय करण्यास सांगितले आहे जसे गोकुळातल्या गोपिका सदैव भगवंतांचेच चिंतन करीत असत. श्रीमद्भागवतात सांगितले आहे -

**या दोहनेऽवहनने मथनोपलेप-**

**प्रेङ्खेङ्खनार्भरुदितोक्षणमार्जनादौ ।**
**गायन्ति चैनमनुरक्तधियोऽश्रुकण्ठ्यो**
**धन्या व्रजस्त्रिय उरुक्रमचित्तयाना: ।।**

(१० । ४४ । १५)

'ज्यांचे चित्त सदैव भगवान श्रीकृष्णांच्या ठिकाणीच लागले आहे. ज्यांची बुद्धी भगवंतांवर अनुरक्त आहे ज्यांचा कंठ प्रेमाश्रुंमुळे गदगद होत आहे आणि ज्या दूध काढताना, दही घुसळताना, धान्य कांडताना, घर लिंपताना, बालकांना झोका देताना, रडणाऱ्या बालकांना गप्प करताना, त्यांना न्हाऊ-माखू घालताना, घरांचे झाडणे-सारवणे करताना - सर्व कामे करताना भगवंतांच्याच गुणांचे गान करत राहतात त्या गोकुळातल्या गोपिका धन्य आहेत.'

अशाप्रकारे मनाला भगवंतांच्या ठिकाणी लावणे म्हणजे मनाने भगवंतांना शरण जाणे होय.

**'मद्भक्तो भव'** ने प्रामुख्याने बुद्धीला भगवंतांच्या ठिकाणी लावण्यास सांगितले आहे. भगवंतच माझे परममित्र अत्यंत दयाळू, अत्यंत प्रेमळ आणि हितचिंतक आहेत. त्यांच्यासारखे दुसरे आणखी कोणीही नाही. शरण जाण्यास योग्य, आत्मीयतेसाठी योग्य, प्रेम करण्यास योग्य फक्त एक भगवंतच आहेत. अशाप्रकारे बुद्धीने भगवंतांच्या गुण-प्रभावाच्या तत्त्व-रहस्याला जाणून केवळ एकट्या भगवंतांच्या ठिकाणी आपलेपणा निर्माण केला पाहिजे. भगवंतांच्या ठिकाणीच अनन्य आणि विशुद्ध प्रेम केले पाहिजे, जसे भक्तश्रेष्ठ प्रल्हादाचे भगवंतांच्या ठिकाणी अनन्य आणि विशुद्ध प्रेम होते. भगवंतांच्या ठिकाणी अनन्य प्रेम असणे हीच खरी भक्ती आहे. शाण्डिल्य भक्तिसूत्रात सांगितले आहे - **'सा परानुरक्तिरीश्वरे'** (सूत्र २), ईश्वराच्याच ठिकाणी अत्यंत प्रेम असणे हीच भक्ती आहे.

अशाप्रकारे बुद्धीला भगवंतांच्या ठिकाणी लावणे म्हणजे बुद्धीने भगवंतांना शरण जाणे होय.

**'मद्याजी भव'** ने भगवंतांनी असा भाव दर्शविला आहे की संपूर्ण यज्ञ-तप इत्यादी कर्मांचा मीच भोक्ता आहे - **'भोक्तारं यज्ञतपसाम्'** (गीता ५ । २९) मीच सर्व प्राणिमात्रांच्या हृदयामध्ये असलेला सर्वांचा आत्मा आहे - **'अहमात्मा गुडाकेश सर्वभूताशयस्थित:'** (गीता १० । २०) आणि मीच सर्वव्यापक आहे - **'मया ततमिदं सर्वम्'** (गीता ९ । ४) - असे समजून माझी पूजा केली पाहिजे. यापुढे स्वत: भगवंतांनीच पूजेचा प्रकार सांगितला आहे -

**यत: प्रवृत्तिर्भूतानां येन सर्वमिदं ततम् ।**
**स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विन्दति मानव: ।।**

(गीता १८ । ४६)

'ज्या परमेश्वरापासून संपूर्ण प्राणिमात्रांची उत्पत्ती झाली आहे आणि ज्याने हे संपूर्ण जग व्यापलेले आहे, त्या परमेश्वराची आपल्या स्वाभाविक कर्मांद्वारा पूजा करून मनुष्य परमसिद्धीला प्राप्त होतो.'

येथे पूजा शब्दाचे असे तात्पर्य आहे की सर्व प्राण्यांच्या ठिकाणी भगवंत आहेत असे समजून भगवद्भावाने नम्रता आणि प्रेमपूर्वक सर्वांच्या हितासाठी आपल्या इंद्रियांनी सर्वांचा आदर-सत्कार-सन्मान करून स्वत: अभिमान आणि स्वार्थ भावाने विरहित होऊन सेवेद्वारा सर्वांना सुख देणे. हीच भगवंतांची व्यापक पूजा आहे. येथे प्रामुख्याने सर्व इंद्रियांना भगवंतांच्या ठिकाणी लावणे होय. म्हणून येथे **'मद्याजी भव'** चा अभिप्राय इंद्रियांनी भगवंतांना शरण जाणे होय.

**'मां नमस्कुरु'** ने आपल्या शरीराला भगवदर्पण करणे असे म्हटले आहे. भाव असा आहे की केवळ एकट्या भगवंतांवर अवलंबून रहावे. आपल्या मनाला अनुकूल किंवा प्रतिकूल जे काही भगवंत करतील म्हणजे अनिच्छा (दैवेच्छा) किंवा परेच्छेने जी काही अनुकूल किंवा प्रतिकूल घटना, पदार्थ आणि परिस्थिती प्राप्त होईल तिला भगवंतांचे विधान (आज्ञा किंवा पुरस्कार) समजून प्रसन्न होऊन तसेच भगवंतांच्या त्या विधानात पावलोपावली दयेचे दर्शन घेत रहावे.

आपले शरीर, इंद्रिय, मन, बुद्धी, शास्त्र आणि सिद्धांतांनुसार अनुकूल घटना, पदार्थ आणि परिस्थितीत भगवंतांच्या दयेचे दर्शन होऊन समाधान मिळणे तर स्वाभाविकच आहे. परंतु ज्याला प्रतिकूलतेतसुद्धा भगवंतांच्या दयेचे दर्शन होत रहाते, तोच भगवंतांच्या दयेच्या तत्त्व-रहस्याला यथार्थ रूपाने जाणतो. अनुकूलतेत जी प्रसन्नता-शांती असते ती तर सगळ्यांच्याच ठिकाणी असते. पण ती राजसी आहे. प्रतिकूलतेलासुद्धा परमेश्वराच्या प्राप्तीस सहाय्यक समजून जी शांती असते तीच सात्विक शांती आहे. आपल्या मनाविरुद्ध आजार प्राप्त झाल्यावर किंवा स्त्री, पुत्र, धन इत्यादींचा विनाश झाल्यावर सुद्धा अशी श्रद्धा पाहिजे की ही घटना दिसायला दुःखकारक आहे; परंतु भगवंतांनी हे माझ्या हितासाठीच केले आहे. यापासून काही लाभ आहे. दुःख भोगल्यामुळे पापांचा नाश होतो. त्यामुळे अंतःकरण शुद्ध होते. संकटाच्या वेळी मनुष्याला भगवंतांची आठवण येते. हे दुःख पापाचे फळ आहे - असे जाणल्यामुळे पुन्हा पापाकडे प्रवृत्ती होत नाही. दुःख सहन केल्यामुळे सहनशक्ती वाढते. अशाप्रकारे जाणल्यानंतर जी शांती मिळते ती सुद्धा सात्विक शांती आहे. पण परमात्मा प्राप्तिरूप जी शांती आहे किंवा त्रिगुणातीत जी परमशांती आहे ती यापेक्षासुद्धा विलक्षण आहे. जो हे तत्त्व जाणून साधना करतो तो कोणत्याही प्रकारची अनुकूल किंवा प्रतिकूल घटना, पदार्थ आणि परिस्थिती प्राप्त झाल्यानंतर तिला भगवंतांचे विधान म्हणजे भगवंतांची आज्ञा समजून भगवंतांच्या प्रसन्नतेतच प्रसन्न रहातो आणि समाधानातच सदासर्वदा मग्न रहातो; ती परमशांती आहे. मग त्या माणसाचा अनुकूलता आणि प्रतिकूलता या दोघांविषयी समभाव असतो आणि त्याच्या ठिकाणी चिंता-भय, हर्ष-शोक, राग-द्वेष, काम-क्रोध, लोभ-मोह इत्यादी विकारांचा संपूर्णपणे अत्यंत अभाव होतो आणि त्याला पावलापावलावर प्रसन्नता शांती आणि आनंदाचा सर्व ठिकाणी अनुभव येत रहातो. भगवंतांच्या त्या भक्ताने आपले मन, बुद्धी, इंद्रिय आणि शरीर यांना संपूर्णपणे भगवदर्पण

केलेले आहे, म्हणून त्याच्या या शरीराद्वारा ज्या काही क्रिया होत असतात त्यातसुद्धा त्याला भगवंतांच्या दयेचा अनुभव येत रहातो; कारण की त्याच्या ठिकाणी कर्तेपण नसतेच ! त्यामुळे त्याच्याकडून जे काही घडते ते भगवंतांच्या संकेतांनुसारच होत असते. भगवंतांची जशी इच्छा असेल तसे कर्म ते त्याच्याकडून करवून घेतात. तो त्या कर्मामुळे होणारे फल-सुख-दुःख, लाभ-हानी, जय-परायज - या सर्वांच्या बाबतीत सम होऊन रहातो. ज्याने आपले सर्वस्व भगवंतांना अर्पण केले आहे त्या मनुष्याकडून जे काही कर्म होते ते शास्त्रांच्या अनुकूलच होत असते. शास्त्रविरुद्ध आणि व्यर्थ कर्म त्याच्याकडून होत नाही, कारण की त्याच्या सर्व क्रिया भगवंतांकडूनच चालविल्या जातात. म्हणून त्या मनुष्याच्या सर्व क्रिया भगवंतांच्या लीलेप्रमाणे आहेत. त्या जगासाठी सुद्धा फारच कल्याणकारक होतात. कारण की त्या आदर्श आहेत. म्हणून त्यांचे अनुकरण करून माणसे मुक्त होतात. अशा श्रेष्ठ महापुरुषासंबंधी भगवंतांनी म्हटले आहे -

**यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जनः ।**
**स यत्प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते ।।**

(गीता ३ । २१)

'श्रेष्ठ पुरुष जे जे आचरण करतो, सामान्य लोक देखील तसतसेच आचरण करतात. तो जे काही नियम सांगून ठेवतो, सर्व जनसमूह त्याप्रमाणेच वागायला लागतो.'

यातून असा निष्कर्ष जाणला पाहिजे की त्या मनुष्याला अनिच्छा (दैवेच्छा) किंवा परेच्छेमुळे जी घटना, पदार्थ, परिस्थिती इत्यादी प्राप्त होतात आणि स्वेच्छेने देखील त्याच्या शरीराकडून जी काही कर्मे होतात त्या सर्वांच्या ठिकाणी तो भगवंतांच्या अनंत अपार अशा दयेचे पावलो पावली दर्शन घेत असतो. तो सर्व पदार्थांमध्ये भगवंतांच्या स्वरूपाचे आणि सर्व क्रियांमध्ये भगवंतांच्या लीलेचा अनुभव घेऊन भगवंतांच्या असीम दयेचे दर्शन घेत रहातो. तसेच सर्व प्रकारच्या परिस्थितीत

निर्विकार, सम, संतुष्ट, प्रसन्न आणि शांत रहातो.

अशाप्रकारे आपले मन, बुद्धी, इंद्रिय, शरीर या सर्वांना केवळ भगवंतांच्या ठिकाणी अर्पण करणे हेच भगवंतांना अनन्य शरण जाणे होय. भगवंतांना अनन्यपणे शरण जाणे असे म्हणा किंवा अनन्य भक्तिसिद्धांताने म्हणा दोन्हीही एकच आहे. भगवंतांनी गीतेत जेथे शरणागतीचे वर्णन केले आहे तेथे भक्तीलाच त्याचे एक प्रमुख अंग असे म्हटले आहे. जसे वरती शरणागती - प्रतिपादक श्लोकात **'मद्भक्तो भव'** असे म्हणून भक्तीला मुख्यत्वेकरून लक्ष्य बनवले आहे. त्याचप्रमाणे गीतेच्या अकराव्या अध्यायातील ५४-५५ व्या श्लोकात भगवंतांनी अनन्य भक्तीचे वर्णन केले आहे -

**भक्त्या त्वनन्यया शक्य अहमेवंविधोऽर्जुन ।**
**ज्ञातुं द्रष्टुं च तत्त्वेन प्रवेष्टुं च परंतप ।।**

'हे परंतप अर्जुना अनन्य भक्तीने तर अशा प्रकारचे रूप असलेला मी प्रत्यक्ष दिसू शकतो, तत्त्वाने जाणला जाऊ शकतो तसेच प्रवेश म्हणजेच एकाकी भावाने देखील प्राप्त केला जाऊ शकतो.'

**मत्कर्मकृन्मत्परमो मद्भक्तः सङ्गवर्जितः ।**
**निर्वैरः सर्वभूतेषु यः स मामेति पाण्डव ।।**

'हे अर्जुना, जो मनुष्य केवळ माझ्यासाठीच संपूर्ण कर्तव्यकर्मांचे आचरण करतो तो मत्परायण आहे, माझा भक्त आहे, आसक्तिरहित आणि संपूर्ण प्राणिमात्रांच्या ठिकाणी वैरभावरहित (निर्वैर) आहे तो अनन्य भक्तीने युक्त पुरुष मलाच प्राप्त होतो.'

येथे ५५ व्या श्लोकात अनन्य भक्तीच्या स्वरूपाचे लक्ष्य करण्यासाठी भक्ताच्या लक्षणांमध्ये **'मत्परमः'** असे म्हणून शरणागतीला भक्तीचे एक प्रमुख अंग म्हणून दर्शविले आहे. यापासून असे जाणले पाहिजे की अनन्य शरण आणि अनन्य भक्ती खरे पाहिले तर एकच आहेत.

अशाप्रकारे जो मनुष्य भगवंतांना अनन्य भावाने शरण जातो,

तो भगवद्भक्त सर्वार्थांनी सर्व ठिकाणी निर्भय होऊन जातो. त्याला कोणाचेच भय वाटत नाही. यमदूत इत्यादी त्याच्या जवळपाससुद्धा फिरकत नाहीत. श्रीविष्णुपुराणात श्रीभीष्मांचे हे वचन आहे -

**किङ्कराः पाशदण्डाश्च न यमो न च यातनाः ।**
**समर्थास्तस्य यस्यात्मा केशवालम्बनस्सदा ।।**

(अंश ३ अ० ७ श्लोक ३८)

'ज्याचे हृदय सदैव भगवान केशवाच्या ठिकाणी परायण आहे त्याचे यम, यमदूत, यमपाश, यमदंड किंवा यमयातना काहीही बिघडवू शकत नाहीत.'

या प्रसंगी पितामह भीष्मांनी विशाल मनाच्या नकुलाजवळ यमराजाद्वारा आपल्या दूतांना दिलेल्या आदेशाचे वर्णन करताना भक्तांची लक्षणे काहीशा विस्तृतपणे सांगितली आहेत. ते तेथे वाचून मनन आणि चिंतन करण्यास योग्य आहेत. अशा प्रकारचे भगवद्भक्त जेथे प्राणत्याग करत आहेत तेथे यमराज आणि यमदूत दोघांनाही जाण्याचा अधिकार नाही. श्रीभीष्म म्हणतात -

**स्वपुरुषमभिवीक्ष्य पाशहस्तं**
**वदति यमः किल तस्य कर्णमूले ।**
**परिहर मधुसूदनप्रपन्नान्**
**प्रभुरहमन्यनृणामवैष्णवानाम् ।।**

'आपल्या दूताला हातात पाश घेतलेले पाहून यमराजाने त्याच्या कानात सांगितले - भगवान मधुसूदनांना शरण आलेल्या व्यक्तींना तू सोडून दे; कारण की जे विष्णुभक्त नाहीत अशा इतर मनुष्यांचा मी स्वामी आहे.'

**हरिममरवरार्चिताङ्घ्रिपद्मं**
**प्रणमति यः परमार्थतो हि मर्त्यः ।**
**तमपगतसमस्तपापबन्धं**
**व्रज परिहृत्य यथाग्निमाज्यसिक्तम् ।।**

'जो सुरवरांनी वंदन केलेल्या भगवंतांच्या चरणकमलांना परमार्थबुद्धीने नमस्कार करतो, संपूर्ण पापबंधनातून मुक्त झालेल्या त्या मनुष्याला तू दूरूनच अशाप्रकारे सोडून निघून जा की ज्याप्रमाणे तुपाच्या आहुतीने प्रज्वलित झालेल्या प्रचंड अग्नीला सोडून देऊन लोक निघून जातात.'

**कलिकलुषमलेन यस्य नात्मा**
**विमलमतेर्मलिनीकृतस्तमेनम् ।**
**मनसि कृतजनार्दनं मनुष्यं**
**सततमवेहि हरेरतीवभक्तम् ।।**

'ज्या शुद्ध बुद्धी असलेल्यांचे मन कलिकल्मषरूप असलेल्या मळाने मलीन झालेले नाही आणि ज्याने आपल्या हृदयात सर्वदा भगवान जनार्दनांना वसवले आहे त्या मनुष्याला तू भगवंतांचा अत्यंत भक्त समज.'

**कनकमपि रहस्यवेक्ष्य बुद्ध्या**
**तृणमिव यः समवैति वै परस्वम् ।**
**भवति च भगवत्यनन्यचेताः**
**पुरुषवरं तमवेहि विष्णुभक्तम् ।।**

'जेथे कोणीही नाही अशा ठिकाणी पडलेल्या दुसऱ्याच्या सुवर्णाला पाहूनसुद्धा जो आपल्या बुद्धीने त्याला तृणासमान मानतो आणि सदैव भगवंतांचे अनन्य भावाने चिंतन करतो, त्या नरश्रेष्ठाला तो विष्णुभक्त आहे असे तू समज.'

**विमलमतिरमत्सरः प्रशान्त-**
**श्शुचिचरितोऽखिलसत्त्वमित्रभूतः ।**
**प्रियहितवचनोऽस्तमानमायो**
**वसति सदा हृदि तस्य वासुदेवः ।।**
**वसति हृदि सनातने च तस्मिन्**
**भवति पुमाञ्जगतोऽस्य सौम्यरूपः ।**

'जो मनुष्य शुद्ध बुद्धी, मत्सररहित, प्रशांत, शुद्ध चरित्र, सर्व प्राणिमात्रांचा सुहृद, प्रिय आणि हितकर वचन बोलणारा तसेच अभिमान आणि कपट रहित असतो, त्याच्या हृदयात भगवान वासुदेव सदैव विराजमान असतात, तसेच त्या सनातन भगवंतांच्या हृदयात विराजित झाल्यानंतर तो मनुष्य या जगाच्या दृष्टीने सौम्य रूप (शांतरूप) होऊन जातो.'

**यमनियमविधूतकल्मषाणा-**
**मनुदिनमच्युतसक्तमानसानाम् ।**
**अपगतमदमानमत्सराणां**
**त्यज भट दूरतरेण मानवानाम् ।।**

'हे दूता, यम[१] आणि नियम[२] यांच्याद्वारा ज्यांच्या पापराशी दूर झालेल्या आहेत, ज्यांचे हृदय निरंतर श्रीअच्युताच्या ठिकाणी आसक्त असते, तसेच ज्यांच्या ठिकाणी गर्व, अभिमान आणि मात्सर्य यांचा लेशमात्रसुद्धा राहिलेला नाही, त्या माणसांना तू लांबूनच टाळून दे.'

**हृदि यदि भगवाननादिरास्ते**
**हरिरसिशङ्खगदाधरोऽव्ययात्मा ।**
**तदघमघविघातकर्तृभिन्नं**
**भवति कथं सति चान्धकारमर्के ।।**

'जर खड्‌ग, शंख आणि गदा धारण करणारे अनादी अव्ययात्मा भगवान श्रीहरी हृदयात विराजमान आहेत तर त्या पापनाशक भगवंतांकडून

---

१-अहिंसासत्यास्तेयब्रह्मचर्यापरिग्रहा यमाः । (योगदर्शन २ । ३०)
'अहिंसा, सत्य, अस्तेय (चोरी न करणे), ब्रह्मचर्य आणि अपरिग्रह - हे पाच 'यम' आहेत.'

२- शौचसंतोषतपःस्वाध्यायेश्वरप्रणिधानानि नियमाः । (योगदर्शन २ । ३२)
'बाह्याभ्यंतर पावित्र्य, संतोष, तप, स्वाध्याय आणि ईश्वर शरण - हे पाच 'नियम' आहेत.'

त्याची सर्व पापे नष्ट होतात. जेथे सूर्य आहे तेथे अंधार कसा बरे थांबू शकेल?'

**सकलमिदमहं च वासुदेवः**
**परमपुमान्परमेश्वरस्स एकः ।**
**इति मतिरचला भवत्यनन्ते**
**हृदयगते व्रज तान्विहाय दूरात् ।।**

'हे संपूर्ण विश्व आणि मी एक परमपुरुष परमेश्वर वासुदेवच आहे, हृदयात भगवान अनंत विराजमान झाल्यावर ज्यांची बुद्धी अशाप्रकारे स्थिर झालेली आहे, त्यांना तू दूरुनच सोडून निघून जा.'

**कमलनयन वासुदेव विष्णो**
**धरणिधराच्युत शङ्खचक्रपाणे ।**
**भव शरणमितीरयन्ति ये वै**
**त्यज भट दूरतरेण तानपापान् ।।**

'हे कमलनयन ! हे वासुदेव ! हे विष्णु ! हे धरणीधर ! हे अच्युत ! हे शंखचक्रपाणे ! आपण आम्हाला आश्रय द्यावा. जे लोक अशाप्रकारे हाक मारतात त्या निष्पाप व्यक्तींना दूरूनच टाळून दे.'

**वसति मनसि यस्य सोऽव्ययात्मा**
**पुरुषवरस्य न तस्य दृष्टिपाते ।**
**तव गतिरथ वा ममास्ति चक्र-**
**प्रतिहतवीर्यबलस्य सोऽन्यलोक्यः ।।**

'ज्या पुरुषश्रेष्ठाच्या अंतःकरणात ते अव्ययात्मा भगवंत विराजमान आहेत, जिथपर्यंत त्याची दृष्टी पडते तिथपर्यंत भगवंतांच्या चक्राच्या प्रभावाने आपले बल-वीर्य पराभूत होते म्हणून तुमची किंवा माझी तिथपर्यंत गती नाही. तो महापुरूष तर इतर वैकुंठ इत्यादी लोकांचा अधिकारी आहे.'

(विष्णुपुराण अं० ३ अ० ७ श्लोक १४, १८, २१, २२,२४, २४।।, २६, २७, ३२, ३३, ३४)

हा आहे अनन्य विशुद्ध भगवद्भक्ती (शरणागती) चा महाप्रभाव ! म्हणून आपण उपर्युक्त प्रकाराने आपले मन, बुद्धी, इंद्रिय, शरीर या सर्वांना केवळ एका भगवंतांच्या ठिकाणी लावून पदोपदी त्यांच्या अपार दयेचे दर्शन घेत, त्यांच्या प्रसन्नतेतच अत्यंत प्रसन्न आणि अत्यंत संतुष्ट राहिले पाहिजे. यामुळे परमपदाची प्राप्ती खूपच लवकर होऊ शकते, म्हणून योगेश्वर श्रीकविने म्हटले आहे-

**कायेन वाचा मनसेन्द्रियैर्वा**
**बुद्ध्याऽऽत्मना वानुसृतस्वभावात् ।**
**करोति यद् यत् सकलं परस्मै**
**नारायणायेति समर्पयेत् तत् ।**

(श्रीमद्भागवत ११ । २ । ३६)

'आपल्या शरीराने, वाणीने, मनाने, इंद्रियांनी, बुद्धीने, आत्म्याने किंवा परंपरागत स्वभावाने मनुष्य जे जे काही करेल ते सर्व परमपुरुष भगवान नारायणांसाठीच आहे - अशा श्रद्धेने त्यांना समर्पण करा.' हा त्यांच्या प्राप्तीचा सोप्यात सोपा उपाय आहे.

*****

# अनन्य भक्तीने भगवत्प्राप्ती

गीतेत भगवंतांनी जेथे जेथे भक्तीचे वर्णन केले आहे, तेथे तेथे भक्ती, भजन, प्रेम वाचक शब्द म्हणून योजले आहेत. म्हणून भक्तिमार्गात प्रेमाचेच प्राधान्य आहे. भगवंतांनी अर्जुनाला म्हटले आहे -

**ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम् ।**

(गीता ४ । ११ चा पूर्वार्ध)

'जे भक्त मला ज्या प्रकारे भजतात, त्या प्रकारे मी ही त्यांना भजतो.'

येथे 'यथा' शब्द 'प्रकार' या अर्थाने आहे, म्हणजे जो माझे ध्यान करतो त्याचे मी ध्यान करतो. जसे महाभारतात वर्णन आले आहे की, राज्य प्राप्तीनंतर राजा युधिष्ठिर श्रीकृष्णांजवळ गेले आणि कृतज्ञता प्रकट करू लागले की हे प्रभो ! आम्ही आपल्या कृपेनेच राज्यप्राप्ती केली आहे; परंतु भगवंतांनी काहीच उत्तर दिले नाही; कारण त्यावेळी ते ध्यानमग्न होते. तेव्हा युधिष्ठिराला आश्चर्य वाटून त्याने विचारले - 'आपण तर अमेय पराक्रमी, संपूर्ण विश्वाचे आश्रयदाता पुरुषोत्तम आहात, आपण कुणाचे ध्यान करत आहात?' यावर भगवंतांनी म्हटले -

**शरतल्पगतो भीष्मः शाम्यन्निव हुताशनः ।**
**मां ध्याति पुरुषव्याघ्रस्ततो मे तद्गतं मनः ।।**

(महा० शान्ति० ४६ । ११)

'हे राजा, शरशय्येवर पडलेले पुरुषसिंह भीष्म, जे ह्यावेळी विझणाऱ्या अग्नीप्रमाणे होत आहेत, माझे ध्यान करत आहेत, म्हणून माझे मन सुद्धा त्यांच्याच ठिकाणी लागलेले आहे.'

यावरून असे जाणले पाहिजे की भीष्मांचे भगवंतांवर केवढे प्रेम

होते ! भगवंतांच्या स्वभावाकडे लक्ष दिले पाहिजे की त्यांचे केवढे सौहार्द आहे ! भगवंत सर्वांचे सुहृद् - अकारण दया आणि प्रेम करणारे आहेत - अशाप्रकारे जाणल्यामुळे मनुष्याला समाधान प्राप्त होते. भगवंत म्हणतात -

**सुहृदं सर्वभूतानां ज्ञात्वा मां शान्तिमृच्छति ।।**

(गीता ५ । २९ चा उत्तरार्ध )

'माझा भक्त मला सर्व प्राणिमात्रांचा सुहृद् म्हणजेच स्वार्थरहित, दयाळू आणि प्रेमळ - असे तत्त्वाने जाणून शांतीला प्राप्त होतो.'

जसे सूर्यप्रकाश सर्वत्र सारखाच असतो, परंतु आरशात तर सूर्य प्रतिबिंबित होऊन प्रत्यक्ष असल्याप्रमाणे दिसतो पण लाकूड किंवा दगडावर मात्र नाही, अशाच प्रकारे भगवंत सर्वत्र समभावाने राहात असून सुद्धा ज्याचे हृदय आरशाप्रमाणे स्वच्छ आहे आणि जो भगवंतांना प्रेमाने भजतो, त्याच्या हृदयात ते विशेषत्वाने निवास करतात. भगवंतांनी स्वत: म्हटले आहे -

**समोऽहं सर्वभूतेषु न मे द्वेष्योऽस्ति न प्रिय: ।**
**ये भजन्ति तु मां भक्त्या मयि ते तेषु चाप्यहम् ।।**

(गीता ९ । २९)

'मी सर्व प्राणिमात्रांच्या ठिकाणी समभावाने व्याप्त आहे, मला कोणीही प्रिय नाही किंवा अप्रियही नाही, परंतु जे भक्त मला प्रेमाने भजतात ते माझ्या ठिकाणी आहेत आणि मी सुद्धा त्यांच्या ठिकाणी प्रत्यक्ष प्रकट आहे.'

जो भगवंतांवर निष्काम भावाने अनन्य प्रेम करतो, भगवंत सुद्धा त्याच्यावर तसेच प्रेम करतात. भगवंतांनी गीतेत सांगितले आहे -

**तेषां ज्ञानी नित्ययुक्त एकभक्तिर्विशिष्यते ।**
**प्रियो हि ज्ञानिनोऽत्यर्थमहं स च मम प्रिय: ।।**

(७ । १७)

'त्यांच्यापैकी सदैव माझ्या ठिकाणी एकभावाने स्थित अनन्य प्रेमभक्ती असलेला, निष्काम, ज्ञानी भक्त अत्यंत उत्तम आहे; कारण की मला तत्त्वाने जाणणाऱ्या ज्ञान्याला मी अत्यंत प्रिय असतो आणि तो ज्ञानी मला अत्यंत प्रिय आहे.'

एवढेच नव्हे तर भगवंतांना भक्त जे काही प्रेमाने देतो ते भगवंत प्रकट होऊन ग्रहण करतात.

**पत्रं पुष्पं फलं तोयं यो मे भक्त्या प्रयच्छति ।**
**तदहं भक्त्युपहृतमश्नामि प्रयतात्मनः ।।**

(गीता ९ । २६)

'जो कोणी भक्त माझ्यासाठी प्रेमाने पत्र, पुष्प, फल, जल इत्यादी अर्पण करतो, त्या शुद्धबुद्धी निष्काम प्रेमळ भक्ताने प्रेमपूर्वक अर्पण केलेले, ते पत्र-पुष्प इत्यादी मी सगुणरूपाने प्रकट होऊन प्रेमाने ग्रहण करतो.'

म्हणून

**यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत् ।**
**यत्तपस्यसि कौन्तेय तत्कुरुष्व मदर्पणम् ।।**

(गीता ९ । २७)

'हे अर्जुना ! तू जे कर्म करतोस, जे खातोस, ज्याचे हवन करतोस, जे दान करतोस आणि जे तप करतोस, ते सर्व तू मला अर्पण कर.'

**शुभाशुभफलैरेवं मोक्ष्यसे कर्मबन्धनैः ।**
**संन्यासयोगयुक्तात्मा विमुक्तो मामुपैष्यसि ।।**

(गीता ९ । २८)

'अशाप्रकारे ज्यात मज भगवंतांच्या ठिकाणी सर्व कर्मे अर्पण होतात - अशा संन्यासयोगाने युक्तचित्त असलेला तू, शुभाशुभ फलरूप कर्मबन्धनापासून मुक्त होशील आणि त्यांपासून मुक्त होऊन तू मलाच प्राप्त होशील.'

म्हणून भक्तीचे साधन सर्व साधनांमध्ये सुगमही आहे -

**अनन्यचेताः सततं यो मां स्मरति नित्यशः ।**
**तस्याहं सुलभः पार्थ नित्ययुक्तस्य योगिनः ।।**

(गीता ८ । १४)

'हे अर्जुना ! जो पुरुष माझ्या ठिकाणी अनन्यचित्त होऊन सदैवच अखंडित मज पुरुषोत्तमाचे स्मरण करतो, त्या नित्य-निरंतर, माझ्या ठिकाणी युक्त असलेल्या योग्याला मी सुलभ आहे, म्हणजेच त्याला मी सहजपणे प्राप्त होतो.'

जर असे म्हटले की सतत चिंतन केल्यामुळे भगवंतांची प्राप्ती सुलभ तर आहेच पण भगवंतांचे सतत चिंतन होणे कठीण आहे. तर याचे उत्तर असे आहे की भगवंतांवर श्रद्धा, प्रेम आणि आत्मीयता असेल तर हे कठीण नाही. कारण की मग नेहमी आणि अखंडित असे चिंतन आपोआपच व्हायला लागते. तसेच भगवंतांबद्दलचे माणसाचे प्रेम स्वाभाविकच असले पाहिजे; कारण की भगवंतांव्यतिरिक्त वास्तविक आपला कोणीही मित्र नसतो तसेच त्यांच्याबरोबर जिवाचा नित्य संबंध आहे. सत्संग आणि शास्त्रांच्या द्वारा भगवंतांचे गुण, प्रभाव, तत्त्व, रहस्य जाणल्यानंतर त्यांच्याविषयी स्वाभाविकच प्रेम निर्माण होते; कारण की भगवंतांसारखा कोणी गुणी आणि प्रभावशाली नाहीच. तसेच भगवद्भक्तीच्या साधनासारखे दुसरे आणखी कोणतेही साधन नाही. भगवंतांनी भक्ती करणाऱ्या श्रद्धाळू भक्ताची विशेष प्रशंसा केली आहे -

**योगिनामपि सर्वेषां मद्गतेनान्तरात्मना ।**
**श्रद्धावान् भजते यो मां स मे युक्ततमो मतः ।।**

(गीता ६ । ४७)

'सर्व योग्यांमध्ये जो श्रद्धावान योगी माझ्या ठिकाणी लावलेल्या अंतरात्म्याने मला निरंतर भजतो, तो योगी मला सर्वश्रेष्ठ म्हणून मान्य आहे.'

सगुणोपासक आणि निर्गुणोपासक यांच्यातील उत्तमपणाविषयी अर्जुनाने विचारल्यानंतर भगवंतांनी सगुणोपासकाला श्रेष्ठ म्हणून सांगितले आहे -

**मय्यावेश्य मनो ये मां नित्ययुक्ता उपासते ।**
**श्रद्धया परयोपेतास्ते मे युक्ततमा मताः ।।**

(गीता १२ । २)

'माझ्या ठिकाणी मनाला एकाग्र करून अखंडपणे माझ्या भजनात आणि ध्यानात लागलेले जे भक्तजन अत्यंत श्रेष्ठ श्रद्धेने युक्त होऊन सगुणरूप मज परमेश्वराला भजतात, ते योग्यांमध्ये अत्युत्तम असलेले योगी मला मान्य आहेत.'

याशिवाय पुढे बाराव्या अध्यायातील ५ व्या श्लोकात निर्गुण-निराकारचे साधन कठीण आहे असे सांगितले आहे आणि पुन्हा सगुण-साकार उपासनेने जिवात्म्याचा त्वरित उद्धार होण्याविषयी सांगितले आहे.

**ये तु सर्वाणि कर्माणि मयि संन्यस्य मत्पराः ।**
**अनन्येनैव योगेन मां ध्यायन्त उपासते ।।**
**तेषामहं समुद्धर्ता मृत्युसंसारसागरात् ।**
**भवामि नचिरात्पार्थ मय्यावेशितचेतसाम् ।।**

(गीता १२ । ६-७)

'परंतु मत्परायण असणारे भक्तजन संपूर्ण कर्मांना माझ्या ठिकाणी अर्पण करून सगुणरूप मज परमेश्वराचेच अनन्य भक्तियोगाने अखंड चिंतन करत भक्ती करतात; हे अर्जुना ! माझ्या ठिकाणी चित्तलय करणाऱ्या त्या प्रेमळ भक्तांचा मी त्वरितच मृत्युरूपी संसार सागरातून उद्धार करणारा असा असतो.'

एवढेच नाही, तो जरी पाप्यांतील पापी असला तरी अनन्य भक्तीच्या प्रभावाने त्वरितच परमशांतीला प्राप्त होतो -

**अपि चेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक् ।**

**साधुरेव स मन्तव्यः सम्यग्व्यवसितो हि सः ।।**
**क्षिप्रं भवति धर्मात्मा शश्वच्छान्तिं निगच्छति ।**
**कौन्तेय प्रति जानीहि न मे भक्तः प्रणश्यति ।।**

(गीता ९ । ३०-३१)

'जरी कोणी अत्यंत दुराचारीसुद्धा अनन्यभावाने माझा भक्त होऊन माझी भक्ती करत असेल तर तो साधू म्हणूनच मानण्यास योग्य आहे. कारण की तो यथार्थ निश्चयी आहे. म्हणजेच त्याने उत्तम प्रकारे निश्चय केला आहे की परमेश्वराच्या भक्तिसारखे दुसरे काहीही नाही.'

'तो लवकरच धर्मात्मा होतो आणि चिरंतन शांतीला प्राप्त होतो. हे अर्जुना, तू निश्चितपणे हे सत्य जाण की माझ्या भक्ताचा कधीही नाश होत नाही.'

भगवंतांची अनन्य भक्ती - अनन्य प्रेमामुळे, भक्त भगवंतांचे दर्शन, यथार्थ ज्ञान आणि भगवंतांमध्ये प्रवेशसुद्धा करू शकतो -

**भक्त्या त्वनन्यया शक्य अहमेवंविधोऽर्जुन ।**
**ज्ञातुं द्रष्टुं च तत्त्वेन प्रवेष्टुं च परंतप ।।**

(गीता ११ । ५४)

'हे परंतप अर्जुना ! अनन्य भक्तिमुळे तर अशाप्रकारे रूप धारण करणारा मी प्रत्यक्ष पाहण्यासाठी, तत्त्वाने जाणण्यासाठी तसेच प्रवेश करण्यासाठी म्हणजेच एकत्वभावाने प्राप्त होण्यासदेखील शक्य आहे.'

असे जरी म्हटले की ज्ञानाशिवाय मुक्ती मिळत नाही - असे शास्त्रामध्ये सांगितले आहे, ते ठीकच आहे, परंतु भक्ती करणाऱ्याला भगवंत स्वतःच ज्ञान प्रदान करतात -

**तेषां सततयुक्तानां भजतां प्रीतिपूर्वकम् ।**
**ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयान्ति ते ।।**

(गीता १० । १०)

'अखंडपणे माझ्या चिंतन इत्यादींमध्ये लागलेल्या आणि प्रेमपूर्वक भजणाऱ्या त्या भक्तांना मी असा तत्त्वज्ञानरूपी योग देतो की ज्यामुळे

ते मलाच प्राप्त होतात.'

म्हणून भक्तियोगात भगवंतांविषयी अनन्य विशुद्ध आणि दृढ प्रेम असणे हे मुख्य आहे. त्या परमप्रेमाच्या प्राप्तीची इच्छा करणाऱ्या साधकांनी आपल्या वेळेचे मुख्यत: तीन विभाग जाणून घेतले पाहिजेत - १ - ऐकांतिक साधनकाल, २ - व्यवहारकाल, ३ - शयनकाल. यांच्यात कशा प्रकारे सुधारणा करून उत्तम रितीने ते व्यतीत केले पाहिजेत यावर विचार करता येतो.

## ऐकांतिक साधनकाल

भक्तियोगाच्या साधकांनी एकांतात बसून जप, ध्यान, पूजा, पाठ (स्वाध्याय), स्तुती, प्रार्थना इत्यादी पुढे दिल्याप्रमाणे उत्तम रितीने करावे.

१ - जप - ज्याप्रमाणे जल, पाणी, नीर, अप्, वॉटर इत्यादी सगळी पाण्याचीच नावे आहेत, त्याप्रमाणे ॐ, हरि, राम, कृष्ण, भगवान, नारायण, वासुदेव, अल्लाह, खुदा, गॉड इत्यादी भगवंतांची हजारो नावे आहेत. ही सगळी सारखीच आहेत. परंतु ज्याची ज्या नामामध्ये रुची, श्रद्धा, विश्वास विशेषत्वाने आहे त्याच्यासाठी तेच नाम विशेष लाभदायक आहे. जो नामजप वाचेने मोठ्याने उच्चारण करून केला जातो त्यापेक्षा जो दुसऱ्यांना ऐकू जाणार नाही, अशा हळू आवाजात ओठांच्या द्वारे उच्चारण केला जाणारा उपांशु नामक जप अधिक महत्त्वाचा आहे. तसेच उपांशु जपापेक्षा मानसिक जप अधिक महत्त्वाचा आहे. श्रीमनुजी म्हणतात -

**विधियज्ञाज्जपयज्ञो विशिष्टो दशभिर्गुणैः ।**
**उपांशुः स्याच्छतगुणः साहस्रो मानसः स्मृतः ।।**

(मनु० २ । ८५)

'विधि-यज्ञापेक्षा जपयज्ञ दहा पटींनी, उपांशु जप शंभर पटींनी आणि मानस जप हजार पटींनी श्रेष्ठ म्हटलेला आहे.

२ - ध्यान - भगवंतांच्या निराकार किंवा साकार आणि साकारामध्येसुद्धा शिव, विष्णु, राम-कृष्ण किंवा इतर ज्या कोणत्याही भगवत्स्वरूपावर ज्याची श्रद्धा, विश्वास आणि प्रेम असेल, त्याच्यासाठी तेच (स्वरूप) विशेष लाभदायक आहे. परंतु भगवंतांच्या स्वरूपाचे ध्यान करताना भगवंतांचे गुण, प्रभाव, तत्त्व-रहस्य यांना जाणून ध्यान केले तर ते विशेष लाभदायक आहे.

३ - पूजा - मंदिरात किंवा आपल्या घरात इष्ट देवतेचे शोडषोपचारांनी विधिपूर्वक श्रद्धा आणि प्रेमाने पूजन करणे उत्तम आहे. याहीपेक्षा उत्तम आहे ते आपल्या हृदयरूप मंदीरात किंवा बाह्य आकाशात आपल्या इष्ट देवाच्या स्वरूपाची स्थापना करून शोडषोपचारांनी विधिपूर्वक श्रद्धा आणि प्रेमाने, मानसिक साहित्याने मानसिक पूजन करणे. बाह्यपूजा तर मनाशिवायसुद्धा होऊ शकते. परंतु मानसिक पूजा तर मन लावल्याशिवाय होतच नाही, म्हणून बाह्य सामग्रीने पूजा करण्यापेक्षा मानसपूजा करणे अधिक श्रेष्ठ आहे.

भगवंतांना प्राणिमात्रांचे निर्माते आणि संरक्षक तसेच प्राणिमात्रांमध्ये स्थित समजून भगवद्भावाने सर्वांची सेवा, आदर-सत्कार करणे - ही भगवत्पूजा व्यापक असल्यामुळे पूर्वी सांगितलेल्या पूजेपेक्षाही श्रेष्ठ आहे. या पूजेचे स्वरूप भगवंतांनी गीतेत असे दर्शविले आहे -

**यतः प्रवृत्तिर्भूतानां येन सर्वमिदं ततम् ।**
**स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विन्दति मानवः ।।**

(१८ । ४६)

'ज्या परमेश्वरापासून सर्व प्राणिमात्रांची उत्पत्ती झाली आहे आणि ज्याने हे संपूर्ण विश्व व्यापलेले आहे, त्या परमेश्वराची जन्मतः प्राप्त झालेल्या आपल्या कर्मांनी पूजा करून मनुष्य परमसिद्धिला प्राप्त होतो.'

४ - पाठ (स्वाध्याय) - श्रुती, स्मृती, इतिहास, पुराण, गीता, रामायण, भागवत, स्तोत्र इत्यादी धार्मिक ग्रंथांच्या सर्वसाधारणपणे

केल्या जाणाऱ्या स्वाध्यायापेक्षा त्या ग्रंथांमध्ये आलेल्या भगवंतांच्या गुण, प्रभावाच्या प्रसंगांचे तत्त्वरहस्य जाणून त्याचे अनुशीलन करणे अधिक लाभदायक आहे.

५ - स्तुती - भगवंतांच्या गुणांचे गायन करणे म्हणजे 'स्तुती' असे म्हटले जाते. जसे, अर्जुनाने गीतेत श्रीकृष्णांची स्तुती केली आहे -

**परं ब्रह्म परं धाम पवित्रं परमं भवान् ।**
**पुरुषं शाश्वतं दिव्यमादिदेवमजं विभुम् ।।**
**आहुस्त्वामृषयः सर्वे देवर्षिर्नारदस्तथा ।**
**असितो देवलो व्यासः स्वयं चैव ब्रवीषि मे ।।**

(१० । १२-१३)

'आपण परमब्रह्म, परमधाम आणि परमपवित्र आहात; कारण की आपल्याला सर्व ऋषिजन सनातन, दिव्य पुरुष आणि देवाधिदेव, अजन्मा आणि सर्वव्यापी असे म्हणतात. तसेच देवर्षी नारद व असित आणि देवल ऋषी, तसेच महर्षी व्यास सुद्धा म्हणतात आणि स्वतः आपण देखील मला सांगत आहात.'

अशाप्रकारे गीतेत तसेच इतर ग्रंथांमध्ये सुद्धा भगवंतांच्या नानाप्रकारच्या स्तुती आढळतात. भगवंतांच्या गुण, प्रभावांना जाणून त्या स्तुतींचे श्रद्धा-प्रेम भावाने गायन करणे विशेष लाभप्रद आहे.

६ - प्रार्थना - कोणत्याही कार्य-सिद्धिसाठी किंवा कोणत्याही वस्तूच्या प्राप्तीसाठी भगवंतांकडे याचना करणे म्हणजे 'प्रार्थना' करणे होय. जसे गीतेत अर्जुनाने चतुर्भुजरूप दर्शन देण्यासाठी भगवंतांना प्रार्थना केली आहे -

**किरीटिनं गदिनं चक्रहस्त -**
**मिच्छामि त्वां द्रष्टुमहं तथैव ।**
**तेनैव रूपेण चतुर्भुजेन**

**सहस्त्रबाहो भव विश्वमूर्ते ।।**

(गीता ११ । ४६)

'मी आपल्याला मुकुट धारण केलेले तसेच हातात गदा व चक्र धारण केलेले असे पाहण्याची इच्छा करतो, म्हणून हे विश्वरूप ! हे सहस्त्रबाहो ! आपण त्याच चतुर्भुजरूपात प्रकट व्हावे !'

अशाप्रकारे भक्तांनी निरनिराळ्या प्रकारे भगवंतांची प्रार्थना (याचना) केली आहे, की ज्यांचे निरनिराळ्या ग्रंथांत वर्णन आढळते. प्रार्थना सुद्धा भगवंतांचे तत्त्व रहस्य जाणून, श्रद्धा-प्रेमपूर्वक भगवंतांच्या ठिकाणी अनन्य विशुद्ध प्रेम प्राप्त करण्यासाठीच केली गेली तर ते फारच उत्तम आहे.

वर सांगितलेल्या सहा साधनांपैकी ज्यावेळी जे कोणते साधन केले जाईल, ते (१) भावासहित अर्थ समजून घेऊन, (२) अत्यंत श्रद्धेने (३) अनन्य विशुद्ध प्रेमाने आणि (४) मनोयोगपूर्वक, (५) गुप्तपणे तसेच (६) निष्काम भावनेने केले पाहिजे. अशाप्रकारे केलेल्या साधनेचे महत्त्व हजारो पटींनी वाढते.

आता या सहा प्रकारांसंबंधी लिहिले जात आहे -

(१) भावासह अर्थ समजणे - जप, ध्यान, पूजा, पाठ, स्तुती, प्रार्थनेचा भावार्थ समजणे म्हणजे जो काही जप, ध्यान, पूजा, पाठ, स्तुती, प्रार्थना केली जाईल त्याचा खरा अभिप्राय (भाव) आणि तत्त्वरहस्य काय आहे हे उत्तम प्रकारे जाणून घेणे.

(२) परम श्रद्धा - कोणाच्याही ठिकाणी प्रत्यक्षात जो विश्वास आणि पूज्य भाव आहे, त्याचे नाव श्रद्धा आहे. तसेच जो प्रत्यक्षापेक्षासुद्धा अधिक पूज्यभावपूर्वक विश्वास आहे त्याचे नाव परमश्रद्धा होय. जसे भगवान शंकरांनी पत्नीसह द्रुपद राजाला असा वर दिला होता की प्रथम तुला कन्या होईल परंतु नंतर तिचे पुरुषात रूपांतर होईल - याप्रमाणे त्यांना कन्या झाली. परंतु भगवान शंकराच्या वचनावर दृढ विश्वास ठेवून, कन्या असतानासुद्धा तिला पुरुष समजून तिचे 'शिखंडी' असे

पुरुषवाचक नाव ठेवले. एवढेच नव्हे तर तिचा विवाह देखील दशार्ण देशाचा राजा हिरण्यवर्मा याच्या कन्येबरोबर करून दिला. श्रीशंकराच्या वरदानानुसार नंतर योग्य समयी शिखंडीला पुरुषत्व प्राप्त झाले (महा० उद्योग० १८८-१९२) याचेच नाव प्रत्यक्षापेक्षासुद्धा अधिक विश्वास म्हणजे परमश्रद्धा होय.

(३) अनन्य विशुद्ध प्रेम - केवळ एक भगवंतच सर्वश्रेष्ठ आहेत, तेच आपले स्वामी, शरण्य, परमगती आणि परमाश्रय आहेत. तेच माता-पिता, भाऊ-बंधु परम हितकारी आणि सर्वस्व आहेत. त्यांच्याशिवाय आपला दुसरा कोणीही आप्त नाही - असे समजून केवळ त्यांच्याच ठिकाणी निःस्वार्थपणे अत्यंत श्रद्धापूर्वक अनन्य निष्काम प्रेम असेल त्यांच्याशिवाय इतर कोणाच्याही ठिकाणी प्रेम नसेल, त्यास 'अनन्य विशुद्ध प्रेम' म्हणतात. गीतेमध्ये यालाच अनन्य भक्ती असे म्हटले आहे (११ । ५४-५५; १३ । १०; १४ । २६). या श्लोकांचा भाव सविस्तरपणे गीता प्रेसने प्रकाशित केलेल्या 'गीतातत्व-विवेचन' टिकेमध्ये पाहू शकता.

(४) मनोयोग - मनापासून साधना करणे म्हणजेच मनोयोगपूर्वक साधना करणे होय. असे होता कामा नये की आपण हातात माळ घेऊन जप करत राहिलो आणि मन कोठेच्या कोठेच जात आहे. कोण्या एका कविने म्हटले आहे -

**माला तो करमें फिरै, जीभ फिरै मुख माहिं ।**
**मनुवाँ तो चहुँ दिसि फिरै, यह तो सुमिरन नाहिं ।।**

अशाप्रकारे गीता-रामायण इत्यादींचे पारायण करताना मन कोठेतरी जात आहे आणि वाचेने पाठ सुरू आहे. कोठे कोणत्या ठिकाणचे वाचन चालू आहे याचा पत्ताच लागत नाही. तेव्हा ती मनोयोगपूर्वक साधना नाही.'

अशाप्रकारे स्तुती-प्रार्थना इत्यादींविषयी जाणून घेतले पाहिजे म्हणून उपर्युक्त साधना करत असताना मन दुसरीकडे कोठेही जाणार

नाही, सदैव साधनेकडेच लागलेले असेल - असा प्रयत्न केला पाहिजे.

(५) गुप्तभाव - वर सांगितलेल्या साधनांमुळे भगवत्कृपेने एखादी विशेष अनुभव असलेली घटना घडली तर तिला आणि साधनांना देखील गुप्त राखले पाहिजे. कोणालाही सांगू नये; कारण की मान, मोठेपणा, प्रतिष्ठेच्या अपेक्षेने सांगितल्यामुळे अभिमान वाढत जातो आणि विशेष अनुभव येणे बंद होते. ज्याप्रमाणे कापराने भरलेल्या डबीचे झाकण उघडल्यावर त्यातील कापूर हळुहळू कमी होत जातो, त्याप्रमाणे आपल्याच मुखातून आपल्या गुण, प्रभाव, साधन किंवा त्याच्या फळाची प्रशंसा केल्याने त्याचे महत्त्व कमी होत जाते. म्हणून गुप्तपणे साधना केली पाहिजे.

(६) निष्कामभाव - ईश्वर, महात्मा, देवता, मनुष्य किंवा इतर कोणत्याही प्राण्यांकडे तसेच अचेतन पदार्थांपासून देखील स्त्री, पुत्र, धन, घर, आरोग्य, दुःखनिवारण, मान, मोठेपणा, प्रतिष्ठा इत्यादी इहलोकातील आणि स्वर्ग इत्यादी परलोकातील कोणत्याही पदार्थांसाठी थोडीदेखील कामना, याचना, अभिलाषा किंवा इच्छा कधीही न करणे म्हणजे 'निष्काम्भाव' होय.

परंतु भगवंतांच्या ठीकाणी परमश्रद्धा आणि परमप्रेमप्राप्तिसाठी जप, ध्यान इत्यादी निरंतर होण्यासाठी, भगवत्प्राप्तिसाठी आणि भगवंतांबरोबर नेहमी संयोग अनुभवासाठी भगवंतांविषयी जी कामना आहे ती निष्कामभावाप्रमाणेच आहे.

## व्यवहारकाल

व्यवहारकालात पुढे लिहिलेल्या सहा गोष्टी उपयोगात आणल्या पाहिजेत -

(१) व्यवहारकालात म्हणजेच चालताना, उठताना, बसताना, खाताना, पिताना, व्यवसाय आणि व्यवहार करताना सदैव भगवंतांचे नाम आणि रूप यांची आठवण ठेवूनच ती कर्मे केली पाहिजेत.

भगवंत अर्जुनाला म्हणतात -

**तस्मात् सर्वेषु कालेषु मामनुस्मर युध्य च ।**
**मय्यर्पितमनोबुद्धिर्मामेवैष्यस्यसंशयम् ।।**

(गीता ८ । ७)

'म्हणून हे अर्जुना सर्वकाळी तू माझे अखंड स्मरण कर आणि युद्धदेखील कर अशाप्रकारे माझ्या ठिकाणी अर्पण केलेल्या मन-बुद्धीने युक्त असा तू नि:संशयपणे मलाच प्राप्त होशील.'

जर भगवंतांचे अखंड स्मरण करत असताना युद्धदेखील होऊ शकते तर इतर सर्व कामे होण्यात कोणता बरे अडथळा येईल? अर्जुन क्षत्रिय होता म्हणून युद्ध करणे हे त्याचे कर्तव्य होते. अशाच प्रकारे इतर वर्णाश्रमांच्या लोकांनी आणि स्त्रियांनी शास्त्रात सांगितलेल्या आपापल्या कर्तव्याचे पालन भगवंतांचे अखंड स्मरण करत असतानाच केले पाहिजे.

(२) मी भगवंतांचा आहे आणि भगवंत माझे आहेत. भगवंतांबरोबर असलेला हा माझा नित्य संबंध सदैव आहे, सदैवच राहील - अशाप्रकारे जाणून भगवंतांबरोबर आत्मीयतेचा संबंध स्थापित केला पाहिजे.

(३) हे सर्व स्थावर-जंगम प्राणी भगवंतांचे आहेत आणि या सर्वांच्या ठिकाणी भगवंत व्याप्त आहेत - असे समजून सर्वांची भगवद्भावाने सेवा केली पाहिजे आणि आदर सत्कार केला पाहिजे.

(४) जे कोणतेही शास्त्रविहीत कर्म केले असेल ते भगवंतांची आज्ञा समजून केवळ भगवंतांच्या प्रसन्नतेसाठी, भगवंतांच्या ठिकाणी विशुद्ध प्रेम राहण्यासाठी आणि भगवत्प्राप्तिसाठीच निष्काम भावनेने केले पाहिजे.

(५) जसे अर्जुनाने आपला रथ, घोडे आणि घोड्यांचे लगाम भगवंतांच्या हातात दिले होते, भगवंत ज्याप्रमाणे अर्जुनाला चालवत होते त्याप्रमाणे तो चालत होता, त्याचप्रकारे आपण देखील आपले मन,

बुद्धी, इंद्रिय आणि शरीररूपी रथ भगवंतांना अर्पण केला पाहिजे. भगवंत जसे नाचवतील तसेच नाचले पाहिजे. हा भगवंतांना शरण जाण्याचा भाव आहे. श्रीभगवान म्हणतात -

**मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ।**
**मामेवैष्यसि युक्त्वैवमात्मानं मत्परायणः ।।**

(गीता ९ । ३४)

'माझ्या ठिकाणी मन असलेला हो, माझा भक्त हो, माझे पूजन करणारा हो, मला प्रणाम कर. अशाप्रकारे आत्म्याला माझ्या ठिकाणी नियुक्त करून मत्परायण असलेला असा तू मलाच प्राप्त होशील.'

**'मन्मना भव'** याप्रमाणे मनाच्या द्वारा भगवंतांचे अखंड चिंतन करणे म्हणजे मनाला भगवंतांच्या ठिकाणी अर्पण करणे होय.

**'मद्भक्तो भव'** याप्रमाणे बुद्धीच्या द्वारा मी भगवंतांचा आहे. अशाप्रकारे तत्त्वतः जाणून भगवंतांवर अनन्य प्रेम करणे म्हणजे बुद्धीला भगवंतांच्या ठिकाणी अर्पण करणे होय.

**'मद्याजी'** याप्रमाणे सर्वांच्या ठिकाणी भगवंत आहेत असे जाणून इंद्रियांच्या द्वारा सर्वांची सेवा-पूजा, सत्कार करणे म्हणजे इंद्रियांना भगवंतांच्या ठिकाणी अर्पण करणे होय.

**'मां नमस्कुरु'** याप्रमाणे देहातून अहंकार-ममता काढून टाकून भगवंतांच्या चरणांची सेवा करण्यास शरीराला लावणे म्हणजे शरीराला भगवंतांच्या ठिकाणी अर्पण करणे होय.

अशाप्रकारे भगवंतांना शरण गेल्यावर त्या भक्ताचे 'करणे' 'होण्यात' रूपांतरित होते.

(६) जे काही सुख-दुःख, लाभ-हानी, अनुकूल-प्रतिकूल वस्तू, परिस्थिती आणि घटना प्राप्त होतात त्या सर्वांना भगवंतांची इच्छा किंवा भगवंतांनी पाठवलेला पुरस्कार किंवा भगवंतांची लीला समजून प्रत्येक वेळी रागद्वेषाने रहित होऊन सम, संतुष्ट आणि प्रसन्न असले पाहिजे.

## शयनकाल

शयनकाली हे जग नाशवंत, क्षणभंगूर, दु:खरूप आहे असे जाणून त्याच्या संकल्पांच्या प्रवाहाचा संपूर्णपणे त्याग करून भगवंतांच्या ठिकाणी विशुद्ध परमप्रेम प्राप्त होण्यासाठी भगवंतांच्या नाम, रूप, गुण, प्रभाव, तत्त्व आणि रहस्यांच्या संकल्पांचा प्रवाह प्रवाहित करत असताना झोपी जावे. त्यामुळे तो निद्राकालदेखील साधना काळाच्या रूपात परिणत होतो.

अशाप्रकारे भक्तियोगाचे साधन केल्यामुळे भगवंतांच्या ठिकाणी अनन्य विशुद्ध परमप्रेमाची प्राप्ती होऊन भगवंतांची प्राप्ती होऊन जाते. म्हणून भगवंतांच्या ठिकाणी अनन्य विशुद्ध परमप्रेम प्राप्त करण्याच्या उद्देशाने माणसाने उपर्युक्त प्रकारे भक्तीचे साधन करण्यासाठी कटिबद्ध होऊन प्राणांतापर्यंत प्रयत्न केला पाहिजे.

*****